अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद

अधिवेशन पहिले : सन १९९२

# निबंध - संग्रह

संपादक

डॉ. जयसिंगराव पवार
अध्यक्ष - अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद

श्री. भास्कर धाटावकर
अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद





प्रकाशक

महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी, कोल्हापूर.

# अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद

## अधिवेशन पहिले (स. १९९२)

(मोराणे प्रनेर, जि. धुळे)

# निबंध - संग्रह



संपादक

**डॉ. जयसिंगराव पवार**

अध्यक्ष, अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद

**श्री. भास्कर धाटावकर**

कार्यवाह, अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद

---

प्रकाशक

**महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी, कोल्हापूर**

---

# संपादकीय निवेदन

गतवर्षी दि. १५/१६ फेब्रुवारी १९९२ रोजी खानदेशातील धुळे जिल्ह्यात मोराणे प्रनेर या गावी अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेचे पहिले अधिवेशन साजरे झाले. सर्व महाराष्ट्रातून, विशेषत: सर्व विद्यापीठीय क्षेत्रांमधून इतिहास-संशोधक, अभ्यासक, प्राध्यापक, विद्यार्थी व इतिहासप्रेमी मंडळी लक्षणीय संख्येने या अधिवेशनास हजर होते. या अधिवेशनाच्या व्यासपीठावर महाराष्ट्रातील अभ्यासकांनी सादर केलेल्या शोध-निबंधांचा हा संग्रह जिज्ञासू वाचकांच्या हाती देताना आम्हास मोठा आनंद होतो आहे.

प्रस्तुत निबंध-संग्रहाच्या प्रसिद्धीकरणाच्या प्रसंगी आम्हास कर्तव्यपूर्तीचे एक समाधानही होते आहे. गत अधिवेशनात कार्यकारणीची निवड बिनविरोध झाल्यावर परिषदेच्या अध्यक्षपदाची सूत्रे हाती घेत असता डॉ. जयसिंगराव पवार यांनी जाहीर केले होते की सदर अधिवेशनात सादर केलेले शोधनिबंध परिषदेच्या पुढील अधिवेशनात ग्रंथरूपाने प्रकाशित केले जातील; आणि त्या कार्यासाठी कोल्हापुरातील "महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी" ही संस्था पुढे होऊन प्रकाशनाची जबाबदारी स्वीकारील. आम्हास या ठिकाणी नमूद करावयास आनंद होतो आहे की महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनीने ही जबाबदारी यशस्वीरित्या पार पाडली आहे. त्यासाठी आम्ही त्या संस्थेचे, विशेषत: ट्रस्टी मंडळाचे ऋणी आहोत.

अधिवेशनात महाराष्ट्राच्या इतिहासाचे प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन असे तीन विभाग पाडून त्या त्या विभागाचे स्वतंत्र कामकाज झाले आणि सर्व विभागांत मिळून एकूण २७ शोधनिबंध अभ्यासकांनी सादर केले. शोधनिबंध सादर केल्यानंतर अभ्यासकाने त्याची एक प्रत संबंधित विभागीय अध्यक्ष अथवा परिषदेचे कार्यवाह यांच्याकडे द्यायची असते; पण काही अभ्यासकांनी तशी ती न दिल्याने कार्यवाहांच्या हाती फक्त १७ शोध निबंध आले. हे १७ शोधनिबंध, अध्यक्ष व तीन विभागीय अध्यक्ष यांची भाषणे व कार्यवाहांचा परिषदेचा अहवाल असे एकूण २२ लेख प्रस्तुत

ग्रंथात संग्रहीत केले आहेत.

छोटेखानी शोधनिबंध त्यांच्या पृष्ठांची काटछाट न करता छापलेले आहेत. पण काही शोधनिबंध विस्ताराने मोठे होते. ते संबंधित लेखकांकडे पाठवून त्यांचा संक्षेप करून घेतला आहे. अधिवेशनाचे प्रमुख अध्यक्ष व तीन विभागीय अध्यक्ष यांची भाषणे जशीच्या तशी पूर्णतया छापली आहेत. प्रस्तुत संग्रहात प्राचीन विभागात ६, मध्ययुग विभागात ६ आणि अर्वाचीन विभागात ५ असे एकूण १७ शोधनिबंध प्रकाशित होत आहेत. काही अपवाद वगळता बहुतेक शोधनिबंध हे तरूण अभ्यासकांनी सादर केले आहेत, हे या निबंध-संग्रहाचे एक वैशिष्ट्य मानावे लागेल. इतिहास-संशोधन क्षेत्राकडे तरूण अभ्यासक लक्षणीय संख्येने आकृष्ट होत आहेत ही मोठी समाधानाची बाब म्हटली पाहिजे.

प्रस्तुतचे शोधनिबंध महाराष्ट्राच्या इतिहासातील अज्ञात अथवा उपेक्षित घटना अथवा व्यक्ती यांच्यावर प्रकाश टाकणारे आहेत. त्यामध्ये प्राचीन मंदिर व मूर्तिशिल्पे, शिलालेख, राजनीतिज्ञ, मराठेशाहीतील कर्तबगार व्यक्ती व त्यांची राजकारणे, मराठी प्रशासन, अप्रकाशित कागदपत्रे, विविध संप्रदाय, सामाजिक चळवळी, स्वातंत्र्य-चळवळ, अर्वाचिन संशोधक असे अनेक विषय येऊन जातात. त्या सर्वांचा येथे परामर्ष घेणे आवश्यक नाही. तथापि एक गोष्टीची आवर्जून नोंद घेतली पाहिजे की बहुसंख्य लेखांमध्ये महाराष्ट्राच्या इतिहासावर काही ना काही नवा प्रकाश टाकण्याचा प्रयत्न अभ्यासकांनी केला आहे; आणि महाराष्ट्राचा सत्येतिहास उजेडात आणणे हे आपल्या परिषदेचे एक प्रमुख उद्दिष्ट असल्याने हा प्रयत्न अत्यंत स्तुत्य मानला पाहिजे.

याचबरोबर आणखी एका बाबीचा उल्लेख करावयास हवा. ती म्हणजे इतिहास-संशोधन क्षेत्रात काही अभ्यासक नवखे असल्याने त्यांचे लेख "शोध-निबंध" या संज्ञेच्या निकषास पुरेपूर उतरत नाहीत याची जाणीव आम्हास असली तरी अशा नवोदित अभ्यासकाची काही नवीन शोधून काढण्याची अथवा अधिवेशनातील इतिहासप्रेमी मंडळीसमोर काही नवीन प्रतिपादन करण्याची धडपड आमच्या दृष्टीने महत्त्वाची वाटते. अशा तरूण संशोधकांसाठी संशोधनाचे अखिल महाराष्ट्रीय व्यासपीठ पुरविणे हे परिषदेचे दुसरे महत्त्वाचे उद्दिष्ट असल्याने अशा नवोदित अभ्यासकांचे निबंध प्रकाशित करून आम्ही त्यांच्या भावी संशोधकीय वाटचालीसाठी त्यांना प्रोत्साहित करीत आहोत. आम्हास खात्री आहे की अशा तरूण अभ्यासकांचे संशोधनात्मक लिखाण हळूहळू अव्वल दर्जाचे बनत जाईल.

अधिवेशनाचे प्रमुख अध्यक्ष म्हणून महाराष्ट्रातील प्रसिद्ध इतिहासकार व ज्ञानकोशकार श्री. स. मा. गर्गे यांच्यासारखी विद्वान व्यक्ती लाभलेली होती. अधिवेशनांतर्गत प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन विभागांनाही अनुक्रमे डॉ. मोरवंचीकर, डॉ. प्र. न. देशपांडे व डॉ. जे. व्ही. नाईक यांच्यासारखे मान्यवर संशोधक लाभलेले होते. या

सर्वांचीच भाषणे महाराष्ट्राच्या एकूण इतिहासाच्या व्याप्तीचा, त्याच्या राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक परंपरांचा - शोध घेणारी आहेत. श्री. गर्गे यांनी स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्युत्तर कालखंडातील इतिहास-लेखनांच्या प्रेरणांचा शोध घेऊन राजकीय इतिहासाबरोबर सामाजिक- इतिहास संशोधनावर अभ्यासकांनी अधिक भर देण्याची आवश्यकता प्रतिपादली आहे. आपल्या अध्यक्षपदावरून श्री. गर्गे यांनी, ''आता इतिहासाचा सामाजिक अर्थ शोधणे ही काळाची गरज'' असल्याचे जे जाहिर केले आहे, त्याची दखल महाराष्ट्रातील इतिहासाचे संशोधक व अभ्यासक अवश्य घेतील असा आम्हास विश्वास वाटतो. तीन विभागीय अध्यक्षांनीही आपल्या विद्वत्ताप्रचुर भाषणात आपापल्या विभागात झालेल्या इतिहास-संशोधन व लेखन कार्याचा मागोवा घेऊन इतिहास-क्षेत्रात पूर्वसूरींनी केलेल्या कार्याचे परिशिलन केले आहे. तसेच सध्या चालू असलेल्या संशोधन कार्यातील दोषांचेही त्यांनी सडेतोड विवेचन करून भावी संशोधकांना त्यांच्या वाटचालीत मार्गदर्शन केले आहे.

शेवटी एक महत्त्वाचा मुद्दा आपणासमोर विचारार्थ मांडीत आहोत. तो असा की या निबंध-संग्रहाच्या संदर्भात कोल्हापूरची ''महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी'' ही संस्था प्रकाशन-कार्यासाठी पुढे झाली, म्हणून हा संग्रह प्रकाशित होतो आहे. तथापि दर वर्षी ही संस्था किंवा या सारखी महाराष्ट्रातील दुसरी एखादी दुसरी संस्था पुढे येऊन अशी जबाबदारी स्वीकारीलच असे नाही. आपण तशी अपेक्षाही ठेवू नये. यासाठी आपण आपली ''अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद'' ही संस्था आर्थिक दृष्ट्या मजबूत पायावर उभी केली पाहिजे. यासाठी आम्ही काही उपाय सुचवू इच्छितो. पहिला उपाय म्हणजे आपणापैकी प्रत्येक जणाने आपल्या परिषदेचे आजीव सभासदत्व स्वीकारावयास हवे. तसेच आपण ज्या संस्थेचे प्रतिनिधित्व करीत आहात, त्या संस्थेसही परिषदेचे आजीव संस्था सभासद बनविले पाहिजे. दुसरा उपाय म्हणजे परिषदेच्या अधिवेशनात आपण सर्वांनी मिळून एक ''प्रकाशन-निधी'' निर्माण केला पाहिजे. या निधीस आपण सर्वांनी काही ना काही हातभार लावला पाहिजे. ते आपण आपले कर्तव्य समजले पाहिजे. अधिवेशनाच्या संयोजकांनाही आपण विनंती केली पाहिजे की अधिवेशनाच्या किमान १/१० खर्चाची रक्कम बाजूला काढून या निधीत जमा करावी. कारण अधिवेशनात सादर केलेल्या निबंधांचे प्रकाशन ही त्या अधिवेशनाची अंतिम फलनिष्पती आहे. त्याचे श्रेय थोडेबहुत अधिवेशनाच्या संयोजकांनीही घ्यावे अशा प्रकारचे प्रयत्न आपण या अधिवेशनापासून चालू ठेवले तर अल्पकाळातच आपल्या परिषदेचा निबंध-संग्रह आपण आपल्या खर्चाने स्वतंत्रपणे काढू शकू. आम्हास असा विश्वास आहे की आपण आमच्या विचाराशी सहमत व्हाल व परिषदेस या कामी पूर्ण सहकार्य कराल.

**- संपादक**

# अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद

## निबंध - संग्रह

## अनुक्रमणिका



१.

# अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद : स्थापनेपासूनची वाटचाल

श्री. भास्कर धाटावकर
कार्यवाह

---

जानेवारी २५, १९८६ मुक्काम दयानंद कॉलेज, सोलापूर. दयानंद कॉलेजच्या स्थापनेच्या रौप्य महोत्सवी वर्ष - सोहळ्यास जोडून प्रा. गजानन भिडे यांनी पुढाकार घेऊन महाराष्ट्रातील इतिहासप्रेमी, संशोधक, अभ्यासक, प्राध्यापक, इतिहास-विभागप्रमुख व विद्यार्थी यांना ''महाराष्ट्र इतिहास परिषदे''च्या बॅनरखाली सर्वांनाच आमंत्रित केले होते. सर्वजण उत्साहाने सहभागी झालेले होते. याच परिषदेत संयोजकांनी महाराष्ट्र राज्याच्या पुराभिलेख विभागास ऐतिहासिक दुर्मिळ कागदपत्रांचे प्रदर्शन आयोजित करण्याचे आमंत्रण दिले होते व त्यावेळी या पुराभिलेख विभागाची धुरा आमच्याकडे असल्याने आमच्या विभागाचे कार्य व जनमानसात अभिलेखांचे महत्त्व विशद करण्याची आलेली एक सुवर्ण-संधी पाहून याच परिषदेत आम्ही सहभागी झालो होतो. सुरुवातीचा उद्घाटन-सोहळा पार पडल्यावर दोन प्रहरीच्या भोजनानंतर परिषदेसाठी जमलेल्या प्रतिनिधींमध्ये ही परिषद नियमितपणे दरवर्षी भरविली जावी, या दृष्टीने चर्चा सुरू झाली. यातूनच प्रमुख-प्रमुख प्रतिनिधींनी एकत्र जमून यावर गंभीरपणे विचार करावा, असे ठरले. त्यानुसार दयानंद कॉलेज हॉस्टेलच्या एका रूममध्ये गंभीर चर्चा झाली. तशी यापूर्वी पंढरपूर येथील अधिवेशनानंतरही परिषदेची अधिकृत नोंदणी करण्याविषयी चर्चा झाली होतीच. पण आवश्यक तो पाठपुरावा न झाल्याने प्रयत्न सफल झाला नव्हता.

या बैठकीस उपस्थित असल्यामध्ये प्रमुख मान्यवरांची यादी तशी खूपच मोठी आहे. तरीही पुणे विद्यापीठाचे इतिहास-विभाग-प्रमुख डॉ. के. एन. चिटणीस, पुण्याचे






अधिवेशनाचे उद्घाटन करीत असता मा. ना. रोहिदासजी पाटील, सोबत श्री. गुलाबराव खैरनार, श्री. भास्कर धाटावकर (कार्यवाह), श्री. स. मा. गर्गे (अधिवेशनाचे अध्यक्ष), डॉ. जे. व्ही. नाईक व डॉ. के. एन्. चिटणीस (परिषदेचे अध्यक्ष).




अधिवेशनाचे प्रमुख अध्यक्ष श्री. स. मा. गर्गे आपले अध्यक्षीय भाषण देत असता. सोबत डॉ. जयसिंगराव पवार (परिषदेचे उपाध्यक्ष), श्री. गुलाबराव खैरनार (अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष), डॉ. के. एन्. चिटणीस (परिषदेचे अध्यक्ष), डॉ. जे. व्ही. नाईक (विभागीय अध्यक्ष), श्री. भास्कर धाटावकर (परिषदेचे कार्यवाह)







अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष श्री. गुलाबराव खैरनार यांचा श्री. स. मा. गर्गे यांच्या हस्ते सत्कार. सोबत डॉ. जयसिंगराव पवार, श्री. भास्कर धाटावकर, डॉ. के. एन्. चिटणीस व डॉ. जे. व्ही. नाईक.



अधिवेशनास जोडूनच भरविलेल्या दुर्मिळ ऐतिहासिक कागदपत्रांच्या प्रदर्शनाचे उद्घाटन करताना मा. ना. रोहिदासजी पाटील, सोबत श्री. गुलाबराव खैरनार, डॉ. के. एन. चिटणीस व श्री. भास्कर धाटावकर



श्री. स. मा. गर्गे, डॉ. माधव कंटक, प्राचार्य सदाशिवराव आठवले, कोल्हापूरचे डॉ. जयसिंगराव पवार, अहमदनगर वस्तुसंग्रहालयाचे संचालक श्री. सुरेश जोशी, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबादचे डॉ. एन. जी. भवरे, अमरावती विद्यापीठाचे डॉ. एन. एन. नगराळे, धुळ्याचे डॉ. प्र. न. देशपांडे, डेक्कन कॉलेजचे डॉ. जी. टी. कुलकर्णी असे जवळ जवळ सर्व विद्यापीठातील व कॉलेजांतील सन्माननीय अभ्यासू प्राध्यापक व संशोधक मंडळी प्रमुख होती. याच बैठकीत डॉ. जयसिंगराव पवारांनी "अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद" स्थापन करण्याचा ठराव आणला आणि डॉ. जी. टी. कुलकर्णी यांनी त्यास अनुमोदन दिले. आणि अशा प्रकारे अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेच्या स्थापनेचा ठराव एकमताने मंजूर झाला. त्यानंतर उपस्थितांकडून परिषदेच्या हंगामी कार्यकारिणीची निवड करण्यात आली. ती अशी - अध्यक्ष : डॉ. के. एन. चिटणीस, उपाध्यक्ष : डॉ. जयसिंगराव पवार, कार्यवाह - श्री. भास्कर धाटावकर, संयुक्त कार्यवाह - डॉ. संजीव प. देसाई, कोषाध्यक्ष - डॉ. माधव कंटक. याशिवाय इतर सन्माननीय सदस्य असे - डॉ. जी. टी. कुलकर्णी, डॉ. वि. ना. हंडियेकर, डॉ. एम. जी. भवरे, डॉ. प्र. न. देशपांडे, श्री. सुरेश जोशी, डॉ. एन. एन. नगराळे. परिषदेची घटना तयार करण्याची व परिषदेची रीतसर नोंदणी करून घेण्याची जबाबदारी या कार्यकारिणीवर सोपविण्यात आली. तद्नंतर परिषदेच्या कार्यकारिणीच्या अनेक बैठकी पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळाच्या कार्यालयात भरविण्यात येऊन परिषदेची घटना कलमवार चर्चा करून सर्वानुमते मंजूर करण्यात आली.

परिषदेचे दैनंदिन कामकाज कार्यवाहांकडेच असल्याने व कार्यवाहांचा मुक्काम मुंबईतच असल्याने परिषदेचे कार्यालय सोयीसाठी मुंबईतच ठेवले गेले. तिथेच १ जुलै १९९१ रोजी परिषदेची संस्था म्हणून "१८६०च्या संस्था - नोंदणी - अधिनियमाखाली" विधिवत नोंदणी करण्यात आली; आणि अशा प्रकारे "अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद" ही संस्था स्थापन झाली.

यावेळी परिषदेची सर्वसाधारण उद्दिष्टे पुढीलप्रमाणे ठरवली गेली.

१) महाराष्ट्राच्या इतिहासाच्या शास्त्रशुद्ध संशोधनास व लेखनास सर्वतोपरी उत्तेजन देणे.

२) स्वदेशीय व परदेशीय अभ्यासक व संशोधकांना ग्रंथरूपाने व इतर साधनरूपाने माहिती उपलब्ध करून देणे.

३) आवश्यक त्या माहितीच्या अभावी जर महाराष्ट्राचा वास्तव इतिहास विपर्यस्त झालेला असेल अगर होत असेल तर योग्य त्या माहितीची प्रसिद्धी करून रूढ झालेले गैरसमज दूर करणे.

४) महाराष्ट्राच्या इतिहासाच्या शास्त्रशुद्ध संशोधनास चालना मिळावी म्हणून परिषदेचे अधिवेशन शक्यतो दरवर्षी भरविणे व हे अधिवेशन जानेवारी - फेब्रुवारी महिन्यात भरविणे.

५) इतिहास संशोधन / लेखन कार्याच्या उत्तेजनार्थ स्वतंत्र निधी जमविणे आणि त्यातून संशोधक / लेखकांना शक्य ते साहाय्य करणे.

६) इतिहास अभ्यासकांना शास्त्रशुद्ध पद्धतीने मार्गदर्शन करण्याकरिता प्रशिक्षण वर्ग, मोडी लिपीचे वर्ग चालविणे.

७) अखिल महाराष्ट्राचा इतिहासाच्या अभ्यासात एकसूत्रता यावी म्हणून इतिहास संशोधन मंडळे, महाविद्यालये, विद्यापीठे, शासकीय अभिलेखागारे यांच्या मार्फत संयुक्त प्रयत्न करणे.

८) जिल्हा पातळीवर ऐतिहासिक वस्तुसंग्रहालये व लेखागारे स्थापन करण्यात उत्तेजन देणे. तसेच शैक्षणिक क्षेत्रात व जनमानसात महाराष्ट्राच्या इतिहासाची आवड निर्माण करणे, इत्यादी.

परिषदेची विधीवत नोंदणी झाल्यावर सदस्य-नोंदणीचे कामकाज रीतसर सुरू झालेच. विशेष आनंदाची बाब म्हणजे वृत्तपत्रांतील परिषदेचे वृत्त ऐकून अनेक मान्यवरांनी आमच्याशी संपर्क साधून स्वतःहून परिषदेचे सभासदत्व स्वीकारलेच, त्याशिवाय परिषदेच्या कार्यात मदतीचा हात पुढे केला. परंतु याचवेळी परिषदेचे प्रथम अधिवेशन कुठे घ्यायचे हा आमच्या पुढचा मोठा प्रश्न होताच. त्यासाठी कोणतीही संस्था अथवा महाविद्यालय पुढे येत नव्हते; आणि याचवेळी आमचे वैयक्तिक मित्र व धुळ्यातील "श्री तुळजाभवानी एज्युकेशन ट्रस्ट" या संस्थेचे अध्यक्ष श्री. गुलाबराव खैरनार यांनी या प्रथम अधिवेशनाचे यजमानपद आनंदाने स्वीकारले. त्यांच्याच सौजन्याने "राजे संभाजी मिलीटरी स्कूल" मोराणे-प्रनेर, जि. धुळे येथे दिनांक १५ व १६ फेब्रुवारी १९९२ रोजी त्यांनी पदरच्या खर्चाने अतिशय सुंदररित्या हे अधिवेशन यशस्वी केले. श्री. खैरनार यांना धुळ्यात "मोठा भाऊ" या नावाने संबोधतात. या अधिवेशन काळात त्यांनी सर्वांना जी खानदेशी आदरातिथ्याची वागणूक दिली, त्याबद्दल अधिवेशनात सहभागी झालेले त्यांना "मोठा भाऊ" या नावानेच संबोधू लागले. या अधिवेशनाचे अध्यक्षस्थान महाराष्ट्रातील नामवंत इतिहासकार श्री. स. मा. गर्गे यांनी भूषविले होते. मा. नामदार रोहिदासराव पाटील, कृषी मंत्री महाराष्ट्र राज्य, यांच्या शुभहस्ते या अधिवेशनाचे उद्घाटन झाले.

आम्हाला नमूद करावयास विशेष आनंद होतो की, अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेचे प्रथम अधिवेशन खानदेशातल्या एका ग्रामीण भागात जरी झाले असले तरी या अधिवेशनास संपूर्ण महाराष्ट्राच्या सर्व विद्यापीठांच्या कक्षेतील कॉलेजांमधील प्राध्यापक, मान्यवर इतिहास-संशोधक व इतिहास-प्रेमी मंडळी मोठ्या संख्येने उपस्थित राहिले होते. अधिवेशनात एकूण २७ शोध-निबंध सादर केले गेले. त्यावर उद्बोधक चर्चाही झाली. ज्येष्ठ संशोधकांनी तरुण अभ्यासकांना मार्गदर्शन केले.

याचवेळी पुराभिलेख विभाग, महाराष्ट्र शासन यांच्या मार्फत ऐतिहासिक दुर्मिळ कागदपत्रांचे प्रदर्शन आयोजित करण्यात आले होते. त्याच बरोबर यंदाचे "चलेजाव

चळवळीचे सुवर्ण महोत्सवी वर्ष'' लक्षात घेऊन ''भारत छोडो आंदोलनात महाराष्ट्राचे योगदान'' या विषयावर एक परिसंवादही आयोजित करण्यात आला होता. अशा प्रकारे सदरचे प्रथम अधिवेशन अत्यंत खेळीमेळीच्या वातावरणात व अत्यंत उत्साहाने संपन्न झाले. याच अधिवेशनात परिषदेच्या नूतन कार्यकारिणीची निवड सन १९९२ ते १९९५ सालाकरिता पुढीलप्रमाणे झाली. विशेष म्हणजे कार्यकारिणीची ही निवड प्रतिनिधींच्या स्वयंस्फूर्तीने बिनविरोध करण्यात आली. परिषदेची नूतन कार्यकारिणी अशी आहे -

| | | |
|---|---|---|
| अध्यक्ष | - | प्रा. डॉ. जयसिंगराव पवार, कोल्हापूर. |
| उपाध्यक्ष | - | प्रा. डॉ. प्र. न. देशपांडे, धुळे. |
| कार्यवाह | - | श्री. भास्कर धाटावकर, मुंबई. |
| सहकार्यवाह | - | प्रा. डॉ. बी. डी. कुलकर्णी, शिरूर, पुणे. |
| खजिनदार | - | श्री. अशोक सोनवणे, मुंबई. |

**सदस्य -**

प्रा. डॉ. जे. व्ही. नाईक, मुंबई, प्रा. डॉ. पी. ए. गवळी, औरंगाबाद, प्रा. गजानन भिडे, सोलापूर, प्रा. बी. एस. बारगळ, कारंजा, अकोला, प्रा. डॉ. के. ए. शेटये, नागपूर, प्रा. डॉ. एम. ए. कुलकर्णी, पुणे.

या नव्या कार्यकारिणीस सल्ला देण्यासाठी महाराष्ट्रातील अन्य मान्यवरांना आमंत्रित म्हणून नियुक्त केले गेले. त्यामध्ये श्री. स. मा. गर्गे, डॉ. के. एन. चिटणीस, डॉ. एम. डी. नलावडे, डॉ. एन. जी. भवरे, डॉ. जी. टी. महाजन यांचा समावेश केल्याचे जाहीर करण्यात आले.

अधिवेशनाच्या शेवटी सर्व प्रतिनिधींच्या अनुमतीने पुढील ठराव मंजूर करण्यात आले -

१) ऑगस्ट महिन्याच्या पहिल्या आठवड्यात महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठे, कॉलेज / संशोधन संस्थामधून ''महाराष्ट्र इतिहास दिन'' साजरा करण्यात यावा. त्यासाठी प्रत्येक संस्थेमधील इतिहास प्रमुखांनी, ''महाराष्ट्र इतिहास दिना''निमित्त व्याख्याने / अभिलेख प्रदर्शने / जवळच्या ऐतिहासिक स्थळांना किल्ले / वास्तू / वस्तू संग्रहालये यांना भेटी इत्यादी कार्यक्रमांचे आयोजन करावे.

२) इतिहास-परिषद ही महाराष्ट्रात सर्वदूर पोचण्यासाठी जिल्हा पातळीवर परिषदेच्या शाखा सुरू करण्यात याव्यात. त्या त्या जिल्ह्याच्या ठिकाणी ऐतिहासिक वास्तू / वस्तूसंग्रहालये सुरू करण्याचा सर्वतोपरी प्रयत्न करण्यात यावा.

३) सदर अधिवेशनात जे शोध निबंध सादर करण्यात आले, ते सर्व परिषदेच्या आगामी अधिवेशनात प्रकाशित करावेत.

४) परिषदेच्या सभासदत्वाची वर्गणी पुढीलप्रमाणे राहील -

| | प्रवेश फी | वार्षिक वर्गणी | एकूण |
|---|---|---|---|
| व्यक्ती सदस्य वर्गणी (एक वर्षासाठी) | रु. १०/- | रु. ५०/- | रु. ६०/- |
| आजीव सदस्य वर्गणी (२० वर्षासाठी) | रु. १०/- | रु. ४००/- | रु. ४१०/- |
| संस्था सदस्य वर्गणी (एक वर्षासाठी) | रु. १०/- | रु. १००/- | रु. ११०/- |
| संख्या / आजीव सदस्य वर्गणी (२० वर्षासाठी) | रु. १०/- | रु. १०००/- | रु. १०१०/- |

५) शेवटी अधिवेशनासाठी आलेल्या सर्व प्रतिनिधींनी अधिवेशन अपेक्षेहून यशस्वी केल्याबद्दल व अधिवेशन काळात पाहुण्यांच्या केलेल्या आदरातिथ्याबद्दल श्री. गुलाबराव खैरनार, त्यांची संस्था, संस्थेचे कर्मचारी व विद्यार्थी यांचे खास आभार मानले.

सदर अधिवेशनाच्या शेवटी परिषदेचे नूतन अध्यक्ष डॉ. जयसिंगराव पवार यांनी अध्यक्षपदाची सूत्रे हाती घेत असताना व्यासपीठावरून जाहीर केले की मोराणेच्या अधिवेशनात वाचले गेलेल्या शोध निबंधांचे प्रकाशन आगामी अधिवेशनात केले जाईल आणि त्याच्या प्रकाशनाची जबाबदारी कोल्हापुरात नव्यानेच स्थापन झालेली "महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी" ही संस्था घेईल. अशाप्रकारे अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेचे प्रथम अधिवेशन उत्तर महाराष्ट्रात खानदेशात अत्यंत उत्साहात संपन्न झाले.

परिषदेचे कार्यालय तूर्त पुराभिलेख विभाग, मुंबई येथे जरी असले तरी कार्यकारिणीच्या सदस्यांना पुणे हे ठिकाण मध्यवर्ती पडते. त्या दृष्टीने कार्यकारिणीच्या बैठकी पुणे येथे श्री. स. मा. गर्गे यांच्या "समाज विज्ञान कोशाच्या" कार्यालयात घेण्यात येतात. या बैठकांची व्यवस्था व त्यासाठी आलेल्या सदस्यांचे आदरातिथ्य श्री. व सौ. गर्गे व त्यांचे कुटुंबीय मोठ्या आस्थेने करतात, याचा या ठिकाणी कृतज्ञतापूर्वक निर्देश करणे गरजेचे आहे.

आणखी एक बाबीचा खास उल्लेख करणे आवश्यक आहे, ती म्हणजे अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेच्या मोराणे येथील अधिवेशनातील निबंध संग्रहरूपाने प्रकाशित करण्याची जबाबदारी कोल्हापूरच्या "महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी" या संस्थेने स्वीकारली व ती त्या संस्थेचे संचालक डॉ. जयसिंगराव पवार यांनी आश्वासन दिल्याप्रमाणे पार पाडली. या प्रशासन कार्यास हातभार म्हणून श्री. स. मा. गर्गे यांनी आपल्या "मराठी रियासत संपादन समिती" हिच्या मार्फत रु. १००१ ची देणगीही दिली आहे. आम्ही कोल्हापूरच्या "महाराष्ट्र इतिहास प्रबोनिधी" या संस्थेचे व श्री स. मा. गर्गे यांचे आभारी आहोत.

शेवटी महाराष्ट्रातील सर्व इतिहास संशोधक, अभ्यासक, प्राध्यापक, विद्यार्थी, इतिहासप्रेमी लोक व सर्व शैक्षणिक संस्था यांना आवाहन करण्यात येते की ही "अखिल

महाराष्ट्र इतिहास परिषद" लवकर स्वत:च्या पायावर उभी राहण्यासाठी आपले एक कर्तव्य म्हणून त्यांनी परिषदेचे आजीव सदस्यत्व स्वीकारावे. या सर्वांच्या सहकार्यावरच परिषदेची भावी वाटचाल प्रगतीची होऊ शकेल. आम्हाला असा विश्वास आहे की मराठी माणसांना इतिहासाबद्दल जबरदस्त प्रेम आहे आणि त्यामुळेच भावी काळात ही परिषद आर्थिकदृष्ट्या भक्कम पायावर उभी राहील.

**भास्कर धाटावकर**
कार्यवाह
अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद

**संपर्काचा पत्ता**

श्री. भास्कर धाटावकर
कार्यवाह, अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद
द्वारा - पुराभिलेख विभाग, महाराष्ट्र राज्य,
एल्फिन्स्टन महाविद्यालय, इमारत, मुंबई - ४०० ०३२

□ □ □

२.

# अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद : अधिवेशन पहिले - अध्यक्षीय भाषण

श्री. स. मा. गर्गे
संपादक - समाज विज्ञान कोश, पुणे

---

मित्रहो,

अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेच्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्षपद मला देऊन आपण माझा फार मोठा गौरव केला आहे असे मी मानतो. आपण दिलेल्या बहुमानाबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहे.

### नव्या संघटनेचे व्यासपीठ

या परिषदेच्या स्थापनेने मराठी इतिहासाच्या क्षेत्रात संशोधनाचे व इतिहासलेखनाचे एक नवे पर्व सुरू झाले आहे असे म्हटल्यास वावगे ठरू नये. अर्थात इतिहासाच्या लेखन-संशोधनाशी निगडीत असलेली ही पहिलीच संस्था वा संघटना नाही हे खरे आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांनी इ.स. १९१० साली स्थापन केलेले 'भारत इतिहास संशोधक मंडळ' ही संस्था म्हणजे महाराष्ट्राच्या इतिहास संशोधन कार्याची गंगोत्रीच मानावी लागेल. या संस्थेने केलेल्या शुभारंभानंतर महाराष्ट्रात मुंबई, नागपूर, पणजी, धुळे, नगर, कोल्हापूर, सातारा, यवतमाळ, नांदेड या ठिकाणी संशोधन कार्याची लहानमोठी केंद्रे स्थापन झाली. तेथे संशोधकांना आपल्या कामाला चालना देता आली. पण या सर्व प्रयत्नांबरोबरच, नव्या जुन्या संशोधकांना एकत्र जमून विचारांची देवाणघेवाण करण्यासाठी, एकमेकांच्या कार्याचा परिचय करून घेण्यासाठी संघटनात्मक प्रयत्न होणेही आवश्यक असते. अशा कार्यासाठी 'अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदे'ने उपयुक्त व्यासपीठ

मिळवून द्यावे अशीच येथे जमलेल्या अभ्यासकांची अपेक्षा आहे. इतिहासाच्या संशोधनाचा एखाद्या संघटनेच्या द्वारे विस्तार आणि प्रसार झाला तरच, इतिहासप्रेमी लेखकांना आणि वाचकांना त्याचा अधिक उपयोग होऊ शकतो. हे सर्व विचारात घेऊनच मी म्हणतो की या परिषदेच्या स्थापनेबरोबर इतिहासविषयक विविध कार्याच्या स्वरूपात संघटनात्मक कार्याचा एक अध्याय सुरू झाला आहे.

या व्यासपीठावर, इतिहासाचार्य राजवाडे यांनी म्हटल्याप्रमाणे, "स्वत:च्या किंवा समाजाच्या किंवा देशाच्या किंवा स्वकीय कालाच्या अभिमानाला बळी पडून कोणत्याही प्रकारच्या पूर्वग्रहांना थारा देता उपयोगी नाही. शिवाय नीती, धर्म, वगैरे शास्त्रातील चलग्रहांच्या अनुरोधाने शुभाशुभ किंवा इष्टानिष्ट मतांचे अधिष्ठान मनात कल्पून हकीकतीवर अभिप्राय देण्याच्या किंवा हकीकत इष्टानिष्ट भासविण्याच्या भरीस पडता कामा नये. निर्मत्सर, तटस्थ, निरहंकार व निर्लेप वृत्तीने झाली असेल ती हकीकत प्रामाणिकपणे दिली पाहिजे. असल्या हकीकतीला खरा व विश्वसनीय इतिहास म्हणतात." (ऐतिहासिक प्रस्तावना : पृ. ३१७, ३१८) वर्तमानकाळातील समाजमूल्ये भूतकालीन घटनांवर लादून पूर्वग्रह करून घेणे इष्ट नसते, एवढाच त्याचा अर्थ. एवढे झाले तरच संघटनेचे उद्दिष्ट साध्य झाले असेच कोणीही म्हणेल.

इतिहास संशोधनाच्या आणि लेखनाच्या क्षेत्रात, विशेषत: मराठी इतिहासाच्या संदर्भात अनेक धुरंधरांनी मोलाची भर घातली आहे. अशा इतिहास संशोधकांच्या साधनांचा मागोवा घेतल्याशिवाय या क्षेत्रात कार्य करणेच शक्य नाही असेही म्हणता येईल. इतिहासाचार्य श्री. वि. का. राजवाडे, श्री. का. ना. साने, श्री. वासुदेवशास्त्री खरे, श्री. ग. चिं. वाड, श्री. द. ब. पारसनीस, रियासतकार गो. स. सरदेसाई या थोर संशोधकांनी महाराष्ट्राच्या इतिहासाला लोकांसमोर उभे केले. त्यांनी अनेक ठिकाणांहून कागदपत्रे मिळविली. पोटाला चिमटा देऊन ती प्रसिद्ध केली आणि पुढच्या इतिहास-लेखकांसाठी अतिशय मौल्यवान असा लेखनसंभार उपलब्ध करून ठेवला. याच महनीय व्यक्तींच्या पावलावर पाऊल टाकून यानंतरच्या काळातही श्री. दत्तोपंत आपटे, श्री. शं. ना. जोशी, प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर, डॉ. वि. गो. दिघे, श्री. वा. सी. बेंद्रे, श्री. मा. वि. गुजर, प्रा. न. र. फाटक, श्री. ग. ह. खरे, श्री. सेतूमाधवराव पगडी यांनी केलेल्या बहुमोल कार्याची भर पडली आणि त्यांचेच सूत्र हाती धरून आजही प्रा. स. शं. देसाई, प्रा. सदाशिव आठवले, डॉ. जयसिंगराव पवार इत्यादी समकालीनांचे कार्यही सातत्याने चालू आहे. याच संदर्भात डॉ. पांडुरंगराव पिसुर्लेकर (पोर्तुगीज), डॉ. व. गो. हताळकर (फ्रेंच), श्री. सेतुमाधवराव पगडी (फारसी) या विद्वानांनी मराठ्यांच्या इतिहासाशी संबंधित असलेल्या परकीय भाषांतील ऐतिहासिक साहित्याचा अनुवाद करून इतिहासाच्या जाणिवेचे क्षेत्र अधिक विस्तारले.

### राजकीय व लष्करी इतिहास

गेली काही वर्षे मी रियासतकार गो. स. सरदेसाई यांनी लिहिलेल्या रियासतीचे नव्या संदर्भासह संपादन करण्याचे काम करीत आहे. या कामाच्या वेळी मनात आलेले काही विचार व अनुभव आपल्यापुढे नमूद करावयाचे मी ठरविले आहे.

रियासतकार सरदेसाई यांनी एखाद्या तपस्व्याप्रमाणे मराठ्यांच्या इतिहासाचे सातत्याने ६० वर्षे लेखन आणि संशोधन केले. मराठ्यांच्या इतिहासाला प्रेरणा देणाऱ्या अगदी आरंभीच्या काळापासून एकोणिसाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकापर्यंत म्हणजे सुमारे दोनशे वर्षांचा इतिहास लिहून ठेवला, म्हणून 'मराठी रियासत म्हणजे मराठ्यांचा साद्यंत आणि साधार इतिहास' असे सार्थ समीकरण बनले. या दोनशे वर्षांच्या राजकारणाची, राज्यकर्त्यांची आणि राजकीय चढउतारांची विस्तारपूर्वक वर्णने रियासतीत दिलेली आहेत. मराठ्यांची स्वराज्य स्थापना आणि त्या स्वराज्याचा साम्राज्यविस्तार होण्यामागे अनेक शूर वीरांचे पराक्रम होते, अनेक मुत्सद्यांची कामगिरी होती. तत्कालीन मोगल सत्तेला निस्तेज करून जवळजवळ देशभर मराठ्यांनी आपल्या राज्याची पताका फडकविली. भारतात इतरत्र जे होऊ शकले नाही ते अपूर्व मराठ्यांनी करून दाखविले.

रियासतकार आणि इतर इतिहास संशोधक व लेखक यांच्या प्रयत्नांमुळे अशा प्रकारे मराठ्यांच्या राजकीय इतिहासाची एक भक्कम चौकट तयार झाली. पण हा सारा राजकीय व लष्करी मोहिमांचा इतिहास आहे. सामान्यत: इतिहास म्हणजे राजकीय घडामोडींचे चित्रच डोळ्यापुढे उभे राहते. अशा इतिहासात सत्ता संपादन करणे, तिचा विस्तार करणे आणि ती बळकट करणे याला प्राधान्य दिले जाते. त्यामुळे अशा इतिहासाच्या लेखनात राजा आणि संबंधित मंत्रीगण त्यांचे डावपेच, कट आणि कारस्थाने, राज्यातील गुप्त खलबते, अधिकारी आणि सेनापती यांच्या खटपटी, तह आणि करार अशा घटनांनाच महत्त्व प्राप्त होते.

### परतंत्र काळातील उद्दिष्ट

एकोणिसाव्या शतकात मराठ्यांच्या इतिहासाची कागदपत्रे संशोधित होऊ लागली तेव्हा संशोधकांच्या आणि लेखकांच्या दृष्टीसमोर विशिष्ट उद्देश होता. त्यांना राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी जनतेला प्रेरित करावयाचे होते. खुद्द रियासतकारांनी इतिहासाचे जे प्रयोजन सांगितले आहे तेही राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या अनुरोधानेच. रियासतकार इतिहासाच्या अभ्यासासंबंधी म्हणतात, "इतिहास हे शास्त्र आहे. इतर शास्त्रांप्रमाणेच त्याचीही वाढ होत गेली पाहिजे. प्रत्येक राष्ट्राला आपल्या इतिहासाची वारंवार उजळणी करणे जरूर आहे. कालमानाप्रमाणे व परिस्थितीप्रमाणे इतिहासाची मांडणी बदलत गेली तरच तिचा राष्ट्रास उपयोग होईल. खरे अभ्यासक ही तत्त्वे लक्षात घेऊन त्याप्रमाणे आपली मनोभूमिका ठेवतात." आणि हे सांगत असतानाच रियासतकार म्हणतात, "इतिहासाचा मुख्य उपयोग

राष्ट्राच्या राजकीय जीवनात प्राधान्ये करून होत असतो." (मराठी रियासत : नवी आवृत्ती, खंड १ पृ. ५)

राजकीय पारतंत्र्याच्या काळात रियासतकारांनी सांगितलेले प्रयोजन योग्यच होते. लोकांची मने जागृत करण्यासाठी इतिहासातील थोर व्यक्तींचा आणि घटनांचा स्फूर्तिदायक इतिहास उपयोगी पडतो असा जगभरचा अनुभव आहे.

पण हे झाले पारतंत्र्याच्या काळातील प्रयोजन. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ते पुरेसे होऊ शकते काय, असा एक महत्त्वाचा प्रश्न येथे उपस्थित होतो. आणि तसे होत नसेल तर इतिहासासाठी नव्या उद्दिष्टांचा, नव्या प्रयोजनाचा आपण विचार केला पाहिजे. ते प्रयोजन कोणते असू शकेल ?

**स्वातंत्र्यप्राप्तीनंतरचे प्रयोजन**

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर इतिहासाचा उद्देश अधिक व्यापक करण्याची गरज पटली म्हणजे, त्याची कालमर्यादाही केवळ सतराव्या आणि अठराव्या शतकापुरतीच ती मर्यादित ठेवता येणार नाही. अशी मर्यादा किमान देवगिरीच्या यादव काळापर्यंत तरी नेऊन पोहोचवावी लागेल, तरच गेल्या सात-आठशे वर्षांच्या काळात समाज कसा जगत होता ? कशासाठी जगत होता ? त्याचे सामाजिक व्यवहार कसे चालत होते ? या प्रश्नांचे आकलन होण्याचे साधन तयार होईल. त्यात अर्थातच तत्कालीन वर्ण, वर्ग, जाती, जात-पंचायती, ग्रामपंचायती, ग्रामीण जीवनाची स्वयंपूर्णता आणि अलिप्तता यांचाही शोध घ्यावा लागेल. तत्कालीन समाजातील धर्मसंस्था, संघटना, कौटुंबिक जीवन, विवाहपद्धती, धर्मसंप्रदाय, नीतिकल्पना, देवदेवता, व्रतवैकल्ये आणि तत्सम अनेक प्रथा व परंपरा यांचे धागेदोरेही त्यात शोधता येतील.

या विवेचनाचा आशय असा की, या पुढच्या काळात केवळ राजकीय आणि लष्करी इतिहासावर विसंबून राहणे पुरेसे पडणार नाही. सामाजिक इतिहासाच्या विविध पैलूंचीही माहिती उपलब्ध होणे आवश्यक आहे. असा इतिहास आजवर उपेक्षितच राहिला. मराठी राज्याप्रमाणे मराठी समाजाचे जीवनही समजण्याची गरज आहे. त्यासाठी महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाची साधने जमविणे आणि त्या साधनांच्या आधारे प्रत्यक्ष इतिहास लिहिणे याच्या आवश्यकतेबद्दल मतभेद असण्याचे कारण नाही. पूर्वकालीन समाजाचे अंतरंग समजणे स्वातंत्र्यानंतर तर अधिकच आवश्यक आहे. त्यावरून आजच्या राजकीय व सामाजिक, धार्मिक व सांस्कृतिक समस्यांची कारणपरंपरा हाती लागण्याची शक्यता आहे.

अनेकदा राजकीय इतिहासाच्या अतिरेकामुळे सामाजिक इतिहासाची साधने लुप्त झालेली किंवा लुप्त होण्याच्या मार्गावर असलेली दिसतात. अशा साधनांचा शोध घेतला आणि त्या साधनांतून इतिहासकालीन समाजव्यवहारातील मौलिक कण शोधले तरच तत्कालीन साहित्य, शास्त्र, कला, भाषा, विज्ञान, संशोधन, समाजघटकांचे

एकमेकांशी संबंध, दैनंदिन जीवनक्रम, समाजाच्या उपजीविकेची साधने इत्यादी अनेकविध सामाजिक पैलूंवर प्रकाश पडू शकेल. म्हणून यापुढे इतिहाससंशोधकांना जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांतून समाजाच्या इतिहासासाठी उपयोगी पडतील अशी कागदपत्रे त्यांचे सामाजिक अंगाने संशोधन करण्याचे काम हाती घ्यावे लागेल, किंबहुना अशा कार्याचीच आता नितांत गरज आहे.

**सत्तेचा इतिहास व समाजाचा इतिहास**

सामाजिक इतिहासावर राजकीय सत्तेचा प्रभाव पडतो हे खरे आहे. समाजाच्या जडणघडणीवर समकालीन सत्तेच्या राजकीय धोरणाचा परिणाम होणे अपरिहार्य असते, हेही खरे आहे. किंबहुना, अशा सत्तेच्या राजकारणामुळे समाजाला निराळे वळण लागते, हेही नाकारता येत नाही. ही वस्तुस्थिती लक्षात घेतली म्हणजे सत्तेच्या इतिहासापासून समाजाचा इतिहास वेगळा शोधणे किती अवघड असू शकते याची कल्पना येईल. पण हे सारे गृहीत धरले तरी, सामाजिक पैलूंवर आणि समाजाच्या सांस्कृतिक जीवनावर भर देऊन इतिहासाचे विवेचन आणि विश्लेषण करणे अशक्य नाही. भारताच्या इतिहासापुरताच विचार केला तरी, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राजकारणात शिरलेल्या अनिष्ट प्रवृत्ती उघड करण्यासाठीही समाजातील वैचारिक प्रेरणांचा अभ्यास आवश्यक ठरतो. खरे तर, राज्यसंस्थेपेक्षा समाजसंस्थेचे स्थान अधिक व्यापक आहे. म्हणून समाजासंबंधीचा विचार अधिक मूलभूत स्वरूपाचा आहे. या संदर्भात गेल्या काही वर्षांत जे संशोधन आणि विवेचन करण्यात येत आहे त्यावरूनही असे लक्षात येते की, सत्तेच्या राजकारणाला आणि राजकीय घटनांना अधिक महत्त्व मिळाल्यामुळे समाजाची जडणघडण करणाऱ्या संस्था आणि संघटना परावलंबी होतात, निस्तेज व निष्क्रीय बनतात. सामाजिक परिवर्तनाच्या दृष्टीने ही स्थिती अयोग्य म्हणावी लागेल. राज्यसंस्था सर्वंकष बनली म्हणजे समाजाच्या विकासाचा, सामाजिक समतेचा आणि स्वातंत्र्याचा किती संकोच होऊ शकतो याची उदाहरणे गेल्या काही वर्षांतील जागतिक घटनांवरून सहज लक्षात येतात, आणि हे सारे टाळण्यासाठीही समाजाच्या प्रेरणांचा, स्वातंत्र्याचा आणि परिवर्तनाचा इतिहासकाळातही वेध घेण्याची गरज आहे.

**सातशे वर्षांतील घटना**

प्रस्तुत विवेचनात महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहाससाधनांपुरताच विचार करावयाचा आहे. अशा साधनांनी लिहिलेला सलग, सुसूत्र व साधार इतिहास अद्याप लिहिलेला नाही. अध्यात्मपर काव्यग्रंथ, संतांचे साहित्य, रामायण-महाभारतासारख्या महाकाव्यांतील कथा, वेद-वाङमयावरील भाष्य इत्यादी ग्रंथातून जे काही समाजदर्शन घडते तेवढेच. तेही अप्रत्यक्ष असते, अल्पप्रमाणात असते आणि अनेक ग्रंथांतून विखुरलेले असते. त्यातून आपल्या इतिहासकाळातील सामाजिक विचार आणि समाजव्यवहार यांचे निखळ दर्शन होत नाही. त्यामुळे गेली सात-आठशे वर्षे आपण परकीय आक्रमणांना

सातत्याने बळी का पडलो आणि तशाच परतंत्र स्थितीत शतकानुशतके निमूटपणे कसे जीवन जगलो याचा उलगडा होत नाही. आपल्या इतिहासातील सतरावे आणि अठरावे शतक सोडले तर, देवगिरीच्या पाडावापासून विसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत आपली प्रतिकारशक्तीच नष्ट झाली होती की काय असा प्रश्न पडतो, आणि ती तशी झाली असल्यास त्याची कारणे कोणती ? अशा कारणांचा शोध घेण्यासाठीही तत्कालीन समाजाच्या वृत्तिप्रवृत्ती, गुणदोष, विचार व व्यवहार यांच्या कार्यकारणभावांचा शोध घ्यावा लागेल. असे सामाजिक मन लक्षात येण्याकरिताही नव्याने ऐतिहासिक साधनांचा शोध घेतला गेला पाहिजे. अगदी फार प्राचीन काळापासून नाही तरी, देवगिरीच्या पराभवापासून तरी असा शोध घ्यावा लागेल.

प्रश्न असा उपस्थित होऊ शकेल की, देवगिरीच्या कालखंडापासूनच सामाजिक इतिहास का शोधला जावा ? त्यापूर्वीचाही समाजप्रवाह शोधण्याची गरज नाही काय ? तसा कोणी विचार केला आणि संशोधनाचे कार्य त्या दिशेने हाती घेतले, तर त्याला प्रतिबंध असण्याचे काहीही कारण नाही. पण देवगिरीच्या पराभवापासून मराठी समाजाचे अंतरंग शोधण्याची आवश्यकता अधिक जाणवते, ती दोन कारणांनी. पहिले कारण व्यावहारिक स्वरूपाचे आहे. गेल्या सात-आठ शतकांतील इतिहासाची काही साधने लिखित वा अन्य स्वरूपात अद्याप उपलब्ध होऊ शकतात. ही साधने काहीशी एकसुरी, अध्यात्मपर आहेत हे खरे असले तरी, इतर साधनांच्या अभावी याच साधनांचा उपयोग करणे शक्य आहे. दुसरे कारण सामाजिक व राजकीय स्वरूपाचे आहे.

**महाराष्ट्राची राजकीय अस्मिता**

देवगिरीवर इ. स. १२९४ या वर्षी अलाउद्दिनाचे आक्रमण झाले आणि अनेक शतकांचा वैभवी इतिहास असलेले देवगिरीचे साम्राज्य त्या परकीय आक्रमणाच्या एकाच तडाख्यात कोसळले, जमीनदोस्त झाले. देवगिरीचा दारूण पराभव झाला. या घटनेबरोबरच ज्ञानदेवांचे निर्वाणही (इ. स. १२९६) त्याच सुमारास झाले. या दोन घटनांनी महाराष्ट्राच्या इतिहासातील एका कालखंडाची समाप्ती झाली. अलाउद्दिनाच्या आक्रमणाने अगदी भिन्न धर्माचा, भिन्न संस्कृतीचा, भिन्न जीवनसृष्टी असलेल्या राजकीय सत्तेचा महाराष्ट्रात प्रवेश झाला. महाराष्ट्राचा सांस्कृतिक एकजिनसीपणा विस्कळीत झाला. देवगिरीच्या पराभवाने महाराष्ट्राची राजकीय अस्मिता परतंत्र बनली, आणि पुढे सुमारे साडेतीनशे वर्षे ती अधिकाधिक पारतंत्र्यात जखडत गेली.

**समाजधर्म आणि मोक्षधर्म**

अशा राजकीय पराभवाच्या घटनेबरोबरच ज्ञानदेवांच्या निर्वाणानेही एक सांस्कृतिक पर्व मागे पडले व ज्ञानदेवांनी आरंभिलेले धार्मिक व वैचारिक प्रबोधनाचे कार्य खूपच मंद झाले. न्या. रानडे यांनी संबोधिलेली 'आध्यात्मिक समतेची परंपरा' ज्ञानदेवांच्यानंतर कुंठित झाली. ज्ञानदेव, नामदेव, गोरोबा, चोखोबा, रोहिदास, नरहरी इत्यादींच्या

समाजाभिमुख विचारांमुळे महाराष्ट्रात आध्यात्मिक समतेचे बीज रुजले. त्याला समाजमानसात अंकुर फुटू लागले. तो विचारप्रवाह तसाच चालू राहिला असता तर, आध्यात्मिक समतेच्या प्रयत्नातून कदाचित अधिक व्यापक 'सामाजिक आशयाची समता' विकसितही झाली असती. 'लोकभाषेत सुरू झालेल्या धर्मचिंतनाला अधिक समावेशक समाजधर्माचे प्रगत परिमाण लागले असते.' पण देवगिरीवरील परकीय आक्रमणामुळे, नवविचारांचा व लोकतत्त्वाचा अंकुर दडपला गेला. त्या आक्रमणाने भिन्न धर्मीय संस्कृतीचे व सत्तेचे वर्चस्व दृढ होत गेले. समाजधर्माचा विचार मंद होऊन समाजमन अध्यात्मात गुरफटले. नव्या प्रबोधनाच्या कार्याला केवळ मोक्षधर्माचा मार्ग चोखाळावा लागला. सतराव्या शतकाच्या मध्यापर्यंत हीच स्थिती चालू राहिली. दरम्यान उत्तरेकडील आक्रमणे वाढत गेली. दक्षिणेत एक नव्हे, पाच बादशाही राजवटी स्थापन झाल्या. त्यांनी सर्व प्रदेश व्यापून टाकला. त्यांना प्रतिकार करणारी शक्तीच या भूमीत राहिली नाही, असे तत्कालीन दृश्य दिसते. सतराव्या शतकाच्या मध्यावर मात्र स्वातंत्र्यभावनेचे स्फुलिंग पेटले. त्यातून स्वाभिमान जागा झाला. प्रतिकारशक्ती संघटित झाली. त्या शक्तीने सुमारे दीडशे वर्षे संघर्ष चालू ठेवला. पण तोही संपला. आणि पुन्हा हा प्रदेश आणि समाज पश्चिमेच्या नव्या आक्रमणापुढे निष्प्रभ ठरला.

हे असे का घडले ? शतकानुशतके अशी पराभूत अवस्था टिकण्यामागे कोणती सामाजिक कारणे असू शकतील ? या प्रश्नांचा शोध घेणे आवश्यक आहे. त्याचबरोबर हा समाज केवळ आध्यात्मिक चिंतनात आणि वैयक्तिक मोक्षसाधनेत एवढा प्रदीर्घ काळ कसा मग्न राहिला ? त्याला भौतिक विकासाची, विज्ञानपर जिज्ञासेची, प्रयत्नवादाची आणि प्रयोगशीलतेची प्रेरणा का मिळू शकली नाही ? समाजाच्या परिस्थितीत परिवर्तन का घडू शकले नाही ? सामाजिक जीवनातील अशा प्रश्नांची उत्तरे शोधावी लागतील. अशा जिज्ञासेतूनच सामाजिक इतिहासाच्या संशोधनाची व लेखनाची प्रवृत्ती वाढीस लागू शकेल अशी अपेक्षा करता येते.

सामाजिक इतिहास एका अर्थाने सांस्कृतिक इतिहासच असतो. त्यात धार्मिक, आर्थिक, राजकीय, कलात्मक आणि तत्सम सामाजिक पैलूंचा विचार गृहीत धरलेला आहे. पण मग असा इतिहास का लिहिला गेला नाही ? त्याची ठळकपणे दोन कारणे स्पष्ट होतात. एकतर समाजमानसावर निवृत्तीपर, धर्मकल्पनांचा आणि त्याला अनुषंगिक कर्मकांडाचा फार मोठा परिणाम झालेला होता. अद्यापही तो परिणाम सर्वार्थाने नाहीसा झालेला नाही. त्यातून दैववाद वाढीला लागला. समाजाच्या भौतिक वृद्धीसाठी होणारे प्रयत्न निरर्थक मानले जाऊ लागले. आयुष्य क्षणभंगूर मानून इहलोकाच्या यशापयशापेक्षा पारलौकिक कल्पिताकडे डोळे लागले. परिणामतः, अशा औदासिन्यामुळे समाजावर होणाऱ्या आक्रमणांचा, अन्यायाचा, अत्याचारांचा प्रतिकार करण्याचेही सामर्थ्य क्षीण झाले. दुसरे कारण म्हणजे परंपरागत विचारांचे प्रतिकार पुनर्मूल्यमापन, नवा अर्थ शोधण्याची जिज्ञासू वृत्तीच खुरटली. याचा अपरिहार्य परिणाम म्हणजे महाराष्ट्रात इतिहासलेखनाची

जवळजवळ परंपराच निर्माण झाली नाही. समाजात घडणाऱ्या महत्त्वाच्या घटना कालक्रमाने लेखनबद्ध करणे, त्यामागील कार्यकारणभाव शोधणे आणि चिकित्सक बुद्धीने त्यांचे विश्लेषण करून ठामपणे काही सिद्धांत सांगणे, असे प्रकार ज्ञानदेवानंतरच्या कालखंडात तरी घडल्याचे ठळकपणे आढळत नाही.

**नव्या इतिहास - संशोधकांपुढे आव्हान**

नव्या इतिहास-संशोधकांपुढे हे आव्हान आहे. त्यांनी ते आव्हान स्वीकारून सामाजिक इतिहासाच्या संशोधनाकडे वळावे.

अद्यापही अनेक दप्तरांत इतिहासाची साधने विविध स्वरूपात पडून आहेत. त्याशिवाय जी कागदपत्रे आजवर राजवाडे, खरेशास्त्री, पारसनीस, सरदेसाई आणि इतर अनेकांनी प्रसिद्ध केली आहेत अशा मुद्रित साधन ग्रंथांतूनही सामाजिक घटनांचे उल्लेख शोधून काढावे लागतील. अशा कागदपत्रांत खरेदीपत्रे, रोखे, ताळेबंद, रोजखर्डा, अशा आर्थिक बाबींचा उल्लेख असलेले कागद आहेत. इनामपत्रे, कौलनामे, कबुलायती, अभयपत्रे आणि तत्सम महसुली कागदपत्रे यांचा समावेश आहे. त्याशिवाय अखबार, जाहीरनामे, तहनामे, कैफियती, करिने, निवाडापत्रे, कानूजागता, महजर, हकीकतवाका अशी ही माहितीपत्रे मिळू शकतात. आणि त्याबरोबरच अग्रहार, वहिवाटीचे दाखले, दानपत्र, सनदापत्रे, वृत्तिपत्रे अशी सामाजिक स्वरूपाची कागदपत्रेही धुंडाळावी लागतील. परदेशी प्रवाशांचे वृत्तांत, व्यापाऱ्यांचे अनुभव, मुत्सद्द्यांच्या आठवणी यांचाही त्यात समावेश करावा लागेल.

मित्रहो, सामाजिक इतिहासाच्या आवश्यकतेचा, महत्त्वाचा, उपयुक्ततेचा आणि संबंधित साधनसामग्रीचा विचार मी यथाशक्ती संक्षेपाने आपल्यापुढे मांडला आहे. सामाजिक इतिहासाची ही योजना नाही. त्यात आणखी कितीतरी भर घालता येईल.

महाराष्ट्राच्या राजकीय जीवनाचा अर्थ समजण्यासाठी त्या क्षेत्रातील साधने आणि सिद्ध ग्रंथ यांचे महत्त्व आहेच. पण आता त्या इतिहासाचा सामाजिक अर्थ शोधणे ही काळाची गरज आहे. तरूण संशोधक त्या दिशेने निष्ठापूर्वक काम करू लागतील असा विश्वास व्यक्त करून आणि आपण मला अध्यक्षपद दिले याबद्दल पुन्हा एकदा आभार मानून माझे भाषण संपवितो.

१२०५/४ शिवाजीनगर, पुणे ४
ता. १५ फेब्रुवारी १९९२

□□□

३.

# प्राचीन विभाग : विभागीय अध्यक्षांचे भाषण

डॉ. रा. श्री. मोरवंचीकर
मराठवाडा विद्यापीठ,
औरंगाबाद

---

महाराष्ट्र इतिहास परिषदेच्या प्रथम वार्षिक अधिवेशनानिमित्त आपण माझी विभागीय अध्यक्षपदासाठी निवड केल्याबद्दल मी परिषदेच्या पदाधिकाऱ्यांचा आणि संयोजक मोठा भाऊ श्री. गुलाबराव खैरनार यांचे मन:पूर्वक आभार मानतो. आपण माझ्यासारख्या संशोधकाची या जबाबदारीच्या पदावर निवड करून माझा गौरव केला आहे, कारण हे पद, आरंभी इतिहास संशोधन क्षेत्रातील मला गुरूस्थानी असणाऱ्या कै. दत्तो वामन, गणेश हरी आदी मान्यवरांनी भूषविले आहे. यापूर्वी म्हणजे गतवर्षीच नगर येथेही या विभागाचे अध्यक्षपद सांभाळण्याची जबाबदारी माझ्यावरच होती. यावर्षीही हा बहुमान माझ्याकडेच देण्याचे आपण ठरविले. आपण दिलेला बहुमान नाकारणे माझ्या शिष्टाचारात बसत नाही म्हणून या आपल्या विनंतीचा मी आदर करतो. हा बहुमान मी माझ्या इतिहासावरील निष्ठेचा, प्राचीन महाराष्ट्रावरील माझ्या संशोधनाचा मी गौरव समजतो.

गेली ३५ वर्षे मी या क्षेत्रात वावरत आहे. १० वर्षे विद्यार्थी म्हणून, १२ वर्षे महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून व १३ वर्षे विद्यापीठीय संशोधक प्राध्यापक म्हणून. माझ्या गावी इतिहासाच्या संशोधन क्षेत्रातील अनुभवाची बरीच मोठी शिदोरी जमली आहे. तथापि यामध्ये तुम्हाला देण्यासारखे फारच थोडे आहे. कारण माझे अनुभव फारसे चांगले नाहीत. त्यामधील जे चांगले आहे ते तुमच्या समोर ठेवतो. आवडेल ते घेण्यास मुभा आहे.

महाराष्ट्र पातळीवरील परिषद खंडीत झाल्याने दरम्यानच्या काळात विभागीय पातळीवर अनेक परिषदा आकारास आल्या. त्या नियमित-अनियमितपणे भरविल्या जाऊ लागल्या. अशा प्रकारच्या परिषदांमधून संशोधनाचा गाडा पुढे रेटण्यास नवे प्रोत्साहन मिळते हे खरे असले तरी, अलिकडे झालेल्या परिषदांची फलश्रुती अत्यंत खेदजनक आहे. त्यांना सोहळ्याचे स्वरूप प्राप्त झाले आहे. अशा प्रकारच्या समारोहामध्ये मिरविणारे कार्यकर्ते अनेक असल्याने त्यामधून उत्साह ओसंडत असतो. पण त्यामधून संशोधनपर काय घडते याचा तपशील कधीच मिळत नाही. संस्कृतीच्या नावाखाली सांस्कृतिक गोंधळ पद्धतशीरपणे घातला जातो. परिषदांतून झालेल्या चर्चेचे प्रकाशन क्वचितच होत असल्याने साराच आनंद असतो. त्यामुळे प्रस्तुतची महाराष्ट्र इतिहास परिषद प्रादेशिक परिषदांसाठी काही आदर्श घालून देईल अशी अपेक्षा करतो. संशोधनामध्ये आणि संशोधकांमध्ये अशा प्रकारची शोचनीय स्थिती निर्माण होण्याची अनेक कारणे आहेत. पैकी काहींचा आपण येथे विचार करू या.

शोध मनस्कता हा ज्ञानार्जनाचा पाया आहे. ती विशिष्ट क्षेत्रिय वा भाषिक अशी अभिक्रिया ( activity ) नसून ती सर्वंकष अशी वृत्ती आहे. आज सर्वच क्षेत्रातील ज्ञानाचा आवाका इतका प्रचंड आहे की, त्याच्याशी साधी जवळीक निर्माण करणे आणि आपल्या अभ्यास विषयाच्या संपर्कात सातत्य ठेवणे दुरापास्त झाले आहे. तथापि चिंतन ही मानवी मेंदूची नित्याची क्रिया असल्याने, नवोदित संशोधकाने विशिष्ट प्रशिक्षण घेतल्यास तो थोड्याशा परिश्रमाने आपल्या अभ्यास विषयांशी संपर्क ठेवू शकतो. पण हे प्रशिक्षण देणार कोण ? पूर्वी विद्यापीठातून अशा प्रकारचे शिक्षण विशेष दक्षतापूर्वक दिले जात असे पण बदलत्या परिस्थितीमध्ये विद्यापीठे ही जबाबदारी पेलण्यास असमर्थ ठरत आहेत.

मग इतक्या कटकटीच्या संशोधनाची आवश्यकताच काय ? तर प्रत्येक क्षेत्रातील ज्ञानाच्या प्रगतीचा आढावा घेतल्यास आपणास जाणवते की, आजचे ज्ञान हे आत्मजागृत (Self conscious) झाले आहे. त्यामुळे अभ्यासकास ज्ञानाचे संपादन करणे, त्याचे आत्मीकरण करणे आणि चिंतनाने त्याचे जतन व संवर्धन करणे अपरिहार्य झाले आहे. म्हणजेच "शोधवृत्त" असणे हे ज्ञानाच्या क्षेत्रात वावरणारांच्या जीवनाचे एक आवश्यक असे वैशिष्ट्य झाले आहे. या मध्यवर्ती संकल्पनेच्या अनुषंगाने विद्यापीठ अनुदान मंडळ व तत्सम संस्थांनी शिक्षक हा आत्मस्वरूपी संशोधक मानून त्याचा सर्वांगीण बौद्धिक विकास व्हावा असे गृहीत धरले आहे. आणि त्याला कार्यप्रवण करण्यासाठी (motivate) अनेक दिशा व संधी उपलब्ध करून दिल्या आहेत. (तथापि अलिकडे संशोधन हा सेवा नियमाचा पदोन्नतीचा आवश्यक घटक झाल्याने संशोधनातील पावित्र्य धोक्यात आले आहे).

दुर्दैवाने उपरोक्त संकल्पनेतील संशोधनाचा विपरीत अर्थ शिक्षण क्षेत्रात रूढ झाला आहे. परिणामी शिक्षण (education) पात्रता (qualification) आणि संशोधन

(research) यांची फारकत झालेली आहे. आजचा विद्यार्थी हा उद्याचा शिक्षक त्यामुळे त्यांची फार मोठी कोंडी झालेली आहे. त्याप्रमाणेच खेडोपाडी ज्ञानार्जन करणाऱ्या शिक्षकांची पण पंचाईत झाली आहे. शिक्षकाला त्याच्या अभ्यास विषयाचे (सखोल बाजूला ठेवल्यास) किमान ज्ञान असणे आवश्यक आहे. कारण त्याचा त्याच्या विद्यार्थ्यांच्या बौद्धिक विकासाशी घनिष्ट संबंध असतो. मुळात त्याच्याजवळ ज्ञानाची पुंजी असल्याशिवाय आणि ज्ञान मिळविण्याचे तंत्र त्याने आत्मसात केल्याशिवाय तो आपल्या विद्यार्थ्यांना विचारप्रवृत्त, संशोधन प्रवृत्त कसे करणार ? इथेच ज्ञानाची आणि संशोधनाची फारकत झाली आहे. ज्ञानासाठी संशोधन नसून सेवेसाठी संशोधन आणि तेही कागदावरील संशोधन अशी व्यवस्था निर्माण झाली आहे. याशिवाय हे संशोधन विशिष्ट हेतू पुढे ठेवून केले जात असल्याने त्यासाठी घाई-गर्दी-ताळमेळ, राजकारण आदिसारखे (अवैध पण निश्चितपणे जवळचे) मार्ग हाताळले जात आहेत.

देशातील शिक्षण पद्धती आणि प्रचलित सदोष परीक्षा पद्धतीमधून शिक्षकांना आपल्या विषयांचे ज्ञान संपादन करता येणार नाही. त्यासाठी त्यांनी किमान काही संशोधन करावे अशी अपेक्षा अनुदान मंडळाने बाळगल्यास आपणास मंडळास दोषी धरता येणार नाही. तथापि या अपेक्षेची पूर्तता करण्यासाठी म्हणून जे संशोधन पुढे आले आहे ते शिक्षण प्रणालीच्या अवनत अवस्थेचे प्रदर्शन करणारे आहे. कारण सर्वसामान्यपणे कला शाखेकडे येणाऱ्या विद्यार्थ्यांची बौद्धिक क्षमता किती असते: जीवनातील सर्व संधी संपल्यानंतर नाईलाज म्हणून बहुतांश विद्यार्थी कलाशाखेकडे येतात. अशा परिस्थितीमध्ये त्यांना संशोधनाभिमुख करण्यासाठी विशेष परिश्रमाची व खास प्रशिक्षणाची आवश्यकता असते. बौद्धिक अडचणीसमवेत त्याला भाषिक अडचणीलाही सामोरे जावे लागते. संशोधनासाठी त्याला तिसऱ्या दर्जाच्या साधनावर अवलंबून राहावे लागते. त्यामुळे त्याच्याकडून कोणत्या संशोधनाची अपेक्षा करणार ? यामध्ये त्याचा दोष मुळीच नसतो. तर त्याला जे बौद्धिक नेतृत्व लाभते, ते दुबळे असते. म्हणून कष्ट करण्याची तयारी असूनही त्याला मूलगामी संशोधनापासून वंचित राहावे लागते. हा अनुदान मंडळाने स्वीकारलेल्या संशोधनाच्या भूमिकेचा उघड पराभव होय.

या पराभवास अन्य घटकही मोठ्या प्रमाणात जबाबदार आहेत. विद्यापीठांची वाढती संख्या हे त्यामागील मोठे कारण आहे. आणि या संख्येला आता कोणी आळा घालू शकत नाही. या प्रत्येक विद्यापीठांतर्गत राबविल्या जाणाऱ्या अभ्यासक्रमात व संशोधनात कोठेच एकवाक्यता नाही. तसेच त्याचे शैक्षणिक कार्यक्रम प्रादेशिक अस्मिता जपणारे असतात असेही नाही. त्यामुळे शैक्षणिक वातावरणात मोठीच पोकळी निर्माण झाल्याचे दिसते. याशिवाय विद्यापीठामध्ये असणारे विभाग त्या पदावर विराजमान असलेल्या व्यक्ती आणि त्यांनी चालविलेले संशोधन यामध्ये कोणतीच सुत्रबद्धता नसते. त्यामुळे या प्रत्येकाला आपणच एकमात्र संशोधक व इतिहासकार असल्याचा अविष्कार होतो. येथे आपण प्रामाणिक संशोधकावर अन्याय करत आहोत याची कोणालाच जाणीव

नसते. "Good researchers are now a dying race." हे कोठेतरी थांबले पाहिजे. पण कोण थांबविणार? थोडक्यात विद्यापीठांच्या संख्येत वाढ होणे म्हणजे कागदी विद्वानांच्या दलात वाढ होय.

आमच्या पैठणलाही एक अभिनव विद्यापीठ-संत विद्यापीठ आकारास येत असल्याचे ऐकतो. त्यामधून बाहेर पडणारे स्नातक संत म्हणूनच बाहेर पडत असतील तर काळजीचे काही कारण नाही. कारण "जगाच्या कल्याणा संतांच्या विभूतीची" नितांत गरज असतेच. आपण त्यांचे स्वागत करू या. आता हा प्रवाह बदलणे शक्य नाही. येथून परतणे होणार नाही. या सर्व अडचणींवर मात करण्यासाठी अशा प्रकारच्या परिषदांतून बल प्राप्त होत असेल तर ती फारच चांगली बाब आहे. या बाह्य समस्येशिवाय इतिहास संशोधनात काही अंगभूत समस्या आहेत. त्यांचाही परिचय करून घेणे अगत्याचे आहे.

काळाच्या चढउतारामध्ये इतिहासाची नूतन साधने उपलब्ध होत असतात. त्यामुळे जुन्या ऐतिहासिक गृहीतकामध्ये बदल होत असतो. हा बदल खिलाडूवृत्तीने स्वीकारता आला पाहिजे. तसेच साधनांचे संपादन निर्दोष झाले पाहिजे. अन्यथा अभ्यासकांची दिशाभूल होण्याची शक्यता असते. म्हणूनच संशोधन पूर्वग्रहदोषविरहित, मूलगामी मुक्त आणि सजीव असले पाहिजे. त्यामधील दांभिकता व दरबारीपणा नष्ट केला पाहिजे. नूतन पुराव्याची स्थळ, काल, प्रसंगसापेक्ष चिकित्सा करण्याचे स्वातंत्र्य अबाधित ठेवले पाहिजे. कोणत्याही ऐतिहासिक घटनेबद्दल भावनाशून्यतेने व कमालीचे शास्त्रशुद्ध लिहिणे शक्य नसले तरी, इतिहासकाराने त्याच्या आहारी जाता कामा नये. पुरावा व त्याचा अन्वयार्थ हेच इतिहासकाराच्या दृष्टीकोणातून महत्त्वाचे. लोकसंग्रहार्थ चुकीच्या व अर्धवट पुराव्यावर काढलेले निष्कर्ष जनमानसात स्थिरावल्यास त्याचे परिणाम वाईट होतात.

संशोधन हा इतिहासाचा आत्मा आहे. पण संशोधनात एक विशिष्ट परंपरा रूढ झाल्याने त्यामधून सामान्य माणूस हरवला आहे. History has to do something with the people. इतिहासाचे आणि सामान्याचे नाते आहे. तथापि त्याचा इतिहास अद्याप अंधारातच आहे. अप्रकाशितच आहे. कारण इतिहासाची म्हणून जी साधने वापरली जात आहेत ती एका विशिष्ट वर्गाची आहेत. त्यामध्ये राजा, सरंजामदार, धर्म, रूढी, परंपरा यांचा पसारा मांडण्यात आला आहे. त्यामुळे याचे स्वरूप History without people असा भासत आहे. मानवी जीवन एक रहस्य आहे. त्याचा शोध घेत घेत आपण जस-जसे मागे जातो तस-तसे ते अधिकाधिक गूढ होत जाते. रहस्यमय होत जाते. म्हणून इतिहासात काही तरी गूढ आहे अशी धारणा होते आणि इथेच संशोधनाची, सत्याची व सामान्य माणसाच्या इतिहासाची फारकत होते. संशोधनाची दिशा बदलते, इतिहासाचे संदर्भ बदलतात आणि सामान्यांच्या ऐवजी गूढ व्यक्तिमत्वाभोवती संशोधन केंद्रित होते. सामान्य माणसाच्या सामान्य संस्कृतीचे

असामान्यत्व अशा रीतीने दुर्लक्षिले जाते. म्हणून इतिहासात गूढ-गुंजनास, भव्य-दिव्य चमत्कारास स्थान नाही. त्याचे स्वरूप जितके साधे ठेवता येईल तेवढे साधे ठेवले पाहिजे.

कालौघात प्रत्येक समाजाला एका विशिष्ट दिव्यातून जावे लागते. दिव्याची तीव्रता कमी झाल्यावर त्यांनी दिलेल्या संघर्षाच्या इतिहासाचे उदात्तीकरण केले जाते. या संदर्भात शेकडो दंतकथा निर्माण होतात. नवी पुराणे मुक्तकंठाने त्यांचे गायन करतात. अशा प्रतिकूल परिस्थितीमध्ये इतिहासाचा मुक्तपणे अभ्यास करून त्याचा निष्कर्ष समाजासमोर मांडणे आणि पूर्वजांनी दिलेला लढा हा मानवी पातळीवरील उदात्त लढा होता; त्यामध्ये यत्किंचितही दैववाद, गूढवाद, मायावाद नव्हता हे स्पष्ट करणे इतिहासकाराचे नैतिक कर्तव्य ठरते. यासाठी सर्वस्पर्शी संशोधनाची कास धरावी लागते. राजकारण, धार्मिक श्रद्धा, सांस्कृतिक मूल्ये, समाजधारणा, कला व वास्तूकला आदि सर्व घटकांचा सापेक्षी विचार करून उपरोक्त सिद्धांताचे यशापयश निश्चित केल्यास ते संतुलित सत्य असेल व त्याला समाजमान्यताही लाभेल. याला जबाबदार असणाऱ्या कोणत्याही एका घटकाचा अभ्यास केल्यास• ते संशोधन एकांगी होईल. अपूर्ण होईल. म्हणून सर्व संबंधित घटकांचा सापेक्ष मागोवा घेणे अगत्याचे आहे. उपरोक्त सिद्धांताचा विचार केल्यास राजकीय संघर्षाला आतापर्यंत आपण इतिहास म्हणून कवटाळले आहे. राजा, सरंजामदार आणि इसवी सन या सूत्राभोवतीच आजपर्यंतचा इतिहास पिंगा घालत असल्याचे स्पष्ट होते.

एकंदरीत संशोधनाचे स्वरूप लोकाभिमुख असले पाहिजे. यामध्ये समाजाला आपले प्रतिबिंब दिसले पाहिजे. म्हणजेच लोकांच्या श्रद्धा, संकल्पना आणि त्यांची अस्मिता यांची पडछाया संशोधनातून आढळली पाहिजे. पण दुर्दैवाने याचा अर्थ विपरीत लावण्यात आला असून त्यामधून प्रादेशिक, भाषिक, राजकीय, जातीय व जमातीय विष पाजले जात आहे. त्यामुळे संशोधन एकांगी, सुमार दर्जाचे व उथळ बनत चालले आहे. केवळ अनुदान मंडळाची कसोटी पूर्ण करण्यासाठी चालविले जात आहे. अशा लोकप्रिय गटाकडेच संशोधनाचे नेतृत्व असल्याने त्यांच्याकडून पोतदार, बेंद्रे, मिराशी, खरे, राजवाडे, सांकलिया, मुजुमदार, पारसनीस, शेजवलकर (ही नामावली व्यापक आहे) यांच्यासारख्या दर्जेदार मूलगामी संशोधकांची व संशोधनाची अपेक्षा करता येणार नाही. याशिवाय संशोधनातूनही काही अडचणी निर्माण झालेल्या आहेत. त्यांचाही आपणास विचार करावा लागतो.

कै. शेजवलकरांनी म्हटल्याप्रमाणे ''इतिहास'' हे महाराष्ट्राच्या मानगुटीवर बसलेले एक भूत आहे. बेकन या पाश्चिमात्त्य विचारवंताने म्हटले होते की, इतिहास माणसाला शहाणपण शिकवितो. पण दिवसेंदिवस या समंधांची महाराष्ट्राच्या मानगुटीवर पकड घट्ट होत आहे आणि परिणामी शहाणी-सुर्ती, कर्ती-धर्ती महाराष्ट्रीय माणसं भूतानं पछाडलेल्या अवस्थेत खुळ्यासारखी वागत आहेत. एकांगी, अतिशयोक्तिपूर्ण, विपर्यस्त व काल्पनिक इतिहासाच्या आहारी जाऊन दुराभिमानी बनली आहेत. विभूतीपूजा-व्यक्तिपूजेचे स्तोम बळावले आहे. त्यामुळे ऐतिहासिक व्यक्तीचे मूल्यमापन

करणे कठीण झाले आहे. राष्ट्राच्या पुनरुज्जीवनासाठी जगभर पुनरुज्जीवनवादाचा स्वीकार केला गेला तसे महाराष्ट्रातही झाले. तथापि त्या प्रवाहातून बाहेर येण्यास महाराष्ट्रीयांची तयारीच नाही. त्यामुळे कधीकाळच्या नेत्यांभोवती दंतकथांचं अभेद्य असे कवच निर्माण झाले आहे. त्यांचे मनुष्यत्व संपून त्यांना देवत्व बहाल केले गेले आहे. लोकमानसात या विकृत प्रतिमांचे इतके स्थिरीकरण व दृढीकरण झाले आहे त्यामुळे खरा इतिहास खोटा वाटत आहे व भासमान इतिहासाने समाज अस्मितेची जागा घेतली आहे. समाजमनात तिने पक्कं घर केलं आहे. त्यामुळे ऐतिहासिक पुराव्याच्या आधारे इतिहासाची पुनर्रचना करणे कठीण होत आहे. एखाद्या व्यक्तीचे इतिहासकाराने केलेले चित्रण जर त्या व्यक्तिच्या लोकसंमत प्रतिमेला छेद देणारे असेल तर लोक त्याचा अस्वीकार करतील. त्यामुळे लोकांना ऐतिहासिक सत्य कथन करण्याबरोबरच त्यांना जागे करण्याचे कामही संशोधकांना करावे लागणार आहे.

संयुक्त महाराष्ट्राचे प्रणेते कै. आचार्य अत्रे मोठ्या अभिमानाने म्हणत असत की महाराष्ट्राला इतिहास आहे व इतर राज्यांना भूगोल आहे. ही वस्तूस्थिती असली तरी महाराष्ट्रीय माणूस मध्ययुगीन गड-कोट-प्रतिमा आणि इतिहास सोडून बाहेर येण्यास तयार नाही. त्याला मध्ययुगीन इतिहासाच्या वेडाने इतके झपाटले आहे की तो मनानेही मध्ययुगात जाण्यास तयार झाला आहे. परिणामी आधुनिक काळाकडे तो मध्ययुगीन चष्म्यातूनच पाहात आहे. हा उपरोक्त पुनरुज्जीवनवादाचा परिणाम होय. आत्मकर्तृत्वाचा इतिहास रुचकर असतो पण त्यातून आत्मगौरवाचा भस्मासूर उदयास येतो. परिणामी विभूतीपूजनादि संकल्पना रूढ होतात आणि मग सापडतील त्या फुलांचे हार कृत्रिम सुगंधाचे शिडकावे देऊन अकृत्रिम प्रेमाने विभूतीवर चढविले जातात. त्याभोवती रुंजी घालणारांची संख्या (population and paupers) भारतात दुर्दैवाने अधिक असल्याने त्यानेच पंथ तयार होतात आणि त्यांनी स्वीकारलेली गृहीतके दूर सारणे असंभवनीय ठरते. परिणामी धर्म-जमात-भावना आदींचा या पंथांना आशीर्वाद प्राप्त होतो. यामध्ये मूळ इतिहासाचा गाभा केव्हा आणि कसा अदृश्य होतो हेच समजत नाही.

मध्ययुगाचे पलीकडे महाराष्ट्रास काही इतिहास आहे ही वस्तुस्थिती मान्य करण्यास महाराष्ट्रीय तयारच नाहीत. याला आजवरच्या संशोधनाची दिशा व संशोधकही मोठ्या प्रमाणात जबाबदार आहेत. तो विभूतीकाराच्या दृष्टिकोनातून आधुनिक काळाकडे पाहात असल्याने या काळातील काही विभूती याला जवळच्या वाटतात. त्यामुळे त्यांच्या कर्तृत्वाला जनमानसात अधिष्ठान लाभले आहे. जी स्थिती आधुनिक काळाची आहे तीच स्थिती प्राचीन कालखंडाची आहे. वास्तविक संशोधनाचे क्षेत्र हे अनंत आकाशाप्रमाणे विस्तारले आहे. आणि ज्येष्ठ संशोधक टॉयनबीने म्हटल्याप्रमाणे एका कालखंडावर जीवनभर संशोधन करण्यासारखे आहे. पण संशोधकाला लोकमानसात आपला ठसा उमटविता आला पाहिजे. व्यक्ती व घटना हे अशा प्रकारचा ठसा उमटविण्याचे एक प्रभावी माध्यम

आहे. तथापि संशोधकांनी त्याच्या आहारी न जाता लोकमानसात घर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

संशोधन लोकाभिमुख करणे निराळे आणि लोकसमजांना संशोधनात नाहक कोंबण्याचा प्रयत्न करणे निराळे. विभूतीवादाच्या दृष्टीकोनातून प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न झाला. तथापि प्राचीन कालखंडातील तशा प्रकारची व्यक्तिमत्त्वे उभी करण्यात इतिहासकारांना अपयश आले आहे. प्राचीन महाराष्ट्रातील गौतमीपुत्र सातकर्णी, वशिष्टीपुत्र पुलमावी, हालसातवाहन, वाकाटक नृपति पृथ्वीवेशा आदि विभूती मध्ययुगीन व्यक्तिमत्त्वाच्या तुलनेत खुजी वाटतात. ती जनमानसाची पकड घेऊ शकत नाहीत. म्हणून महाराष्ट्राला प्राचीन इतिहास नाही काय? अर्थात आहे. तो वैभवशाली आहे आणि लोकांपर्यंत नेणं संशोधकांसमोर मोठे आव्हान आहे. ते स्वीकारले पाहिजे. या पार्श्वभूमीवर आपण महाराष्ट्राच्या इतिहासावर झालेल्या कार्याचा आढावा घेऊ या, तसेच संशोधन करण्यासारख्या क्षेत्राचाही परिचय करून घेऊ या.

महाराष्ट्राच्या इतिहास लेखनाचे आजवर अनेक प्रयत्न झाले. अगदी इंग्रजी अमदानीपासून अशा प्रकारचे प्रयत्न झाल्याचे आढळतात. तथापि इंग्रजांनी लिहिलेल्या इतिहासामध्ये ऐतिहासिक चिकित्सेऐवजी भाषिक अलंकरण मोठ्या प्रमाणात झालेले आढळते. अर्थात यासाठी आपणास त्यांना दोषी धरता येणार नाही. पण त्यांनी भारतीय इतिहास लेखन-पद्धतीची एक ताठर चौकट तयार केली. आणि विपर्यस्तपणे स्वतःच्या राजकारणास पोषक अशी बैठक तयार करून घेतली. भारतीयांना प्राचीन इतिहासात गुंतवून ठेवणे हे त्यांचे एक उद्दिष्ट होते. त्यामधूनच प्राचीन कालखंडातील सोन्याच्या धुराची कल्पना, तसेच दुधाच्या आणि मधाच्या नद्यांचे वाहणे, आर्यांची देहयष्टी व रंग इंग्रज माणसासारखा असणे अशी शेकडो काल्पनिक सत्ये ऐतिहासिक सत्ये म्हणून घुसडण्यात आली. अद्याप तरी भारतीय या गौरव-ग्लानीतून बाहेर आलेला दिसत नाही. त्यामुळे प्राचीन कालखंडात झालेले सारेच भव्य-दिव्य अशी इतिहासकारांची धारणा झाल्यास त्याचे वैषम्य वाटण्याचे कारण नाही. अर्थात प्राचीन कालखंडात सुबत्ता नव्हती असे नाही. पण तिचे जे उदात्तीकरण झाले ते कमालीचे. स्वातंत्र्यानंतरच्या चार दशकात या धारणेत बदल झाला. तथापि तो काही संस्थापुरताच मर्यादित राहिला.

महाराष्ट्र इतिहास संशोधनाचा विचार केल्यास त्याच्या इतिहासपूर्व व प्रागैतिहासिक कालखंडावर भरीव काम झाले आहे. त्याचा विचार इतरत्र झाला आहे. तथापि जातक-कालातील महाराष्ट्रासंबंधी आपणास फारशी माहिती नाही. या कालखंडाचे अनेक पैलू अद्याप प्रकाशात यावयाचे आहेत. तसेच येथील गणराज्याचे स्वरूपही अद्याप अस्पष्टच आहे. अश्मक-मूलक हीच केवळ दोन जनपदे महाराष्ट्रात होती काय? याशिवाय कृष्णा-गोदा-भीमा-नीरा-सीमा-तापी-मांजरा-तेरणा आदि नद्या व त्यांच्या उपनद्यांच्या खोऱ्यात मानवी संस्कृती निर्माण झाली नाही काय? या सर्वांना आपण तापी-गोदा खोरे म्हणू या. तापी व गोदा या खोऱ्यांतील संस्कृतीच्या प्रेरणा भिन्न होत्या. या उभय

खोऱ्यातील संस्कृतीचे अनेक पैलू अद्याप प्रकाशात यावयाचे आहेत. ते प्रकाशात आल्यास सातवाहनपूर्व कालातील महाराष्ट्राच्या जन-जीवनाचा इतिहास रेखाटण्यास मदत होईल.

तसा विचार केल्यास महाराष्ट्राचा इतिहास अपूर्ण आहे. आतापर्यंतच्या संशोधनातून अनेक नूतन साधने प्रकाशात आली आहेत. पण यामध्ये एकसूत्रता नाही. ऐतिहासिक पुरातत्त्वाच्या क्षेत्रात विशेषत: शिलालेख, नाणी, स्मारके, भौतिक संस्कृतीचे विविध अवशेष यामध्ये चांगले काम झाले आहे. पण त्याचा इतिहास लेखनासाठी फारसा उपयोग झालेला नाही. त्यामुळे ते संशोधकांपर्यंत पोहोचलेले नाही. मग विद्यार्थ्यांचा प्रश्नच निर्माण होत नाही. या दृष्टिकोनातून विचार केल्यास ''सातवाहनकालीन महाराष्ट्रावर'' व्यापक काम झाले आहे. त्यांच्या स्थळावर उत्खननेही मोठ्या प्रमाणात झाली आहेत. त्यांच्या भौतिक संस्कृतीचे चित्र त्यामुळे अधिक स्पष्ट झाले आहे. त्यामुळे काही प्रश्न नव्याने निर्माण झाले आहेत. त्यापैकी काहींचा ऊहापोह होणे अगत्याचे आहे.

या कालखंडात महाराष्ट्रात बौद्ध धर्माचा प्रसार मोठ्या प्रमाणात झाला. त्यांना आश्रयदातेही मोठ्या प्रमाणात मिळाले. स्वत: सातवाहन वैदिक धर्माभिमानी होते. त्यांनी अश्वमेघादी यज्ञ केल्याच्या नोंदी आढळतात. वेदश्री, यज्ञश्री ही नावेही त्यांचा वैदिक धर्माभिमान स्पष्ट करतात. मग बौद्धधर्म प्रसारामागील प्रेरणा कोणती होती? परिसरातील भौतिक विकास हीच त्यामागील प्रेरणा होती काय? उत्खननामधून या संदर्भात अनेक उपोद्बलक पुरावे हाती आले आहेत. तथापि भौतिक विकासाचे आरेखन अद्याप शास्त्रशुद्ध नाही आणि इतिहास लेखन व ऐतिहासिक पुरातत्त्व यात म्हणावा तसा सुसंवाद अद्याप प्रस्थापित झालेला नाही. सातवाहनकालात महाराष्ट्राचे नागरीकरण झाले असे मानले जाते. पाश्चिमात्यांशी व्यापार हे त्यांचे मूलभूत कारण होते. परंतु नागरीकरणाचे स्वरूप व विस्तार अद्याप स्पष्ट झालेले नाही. या क्षेत्रात तुटक-तुटक असे कार्य (मोठ्या प्रमाणात) झाले आहे. पण त्यामधून सूत्रबद्ध असा कोणताच निष्कर्ष हाती आलेला नाही. हा कालखंड तुलनात्मकदृष्ट्या समृद्धीचा कालखंड होय. त्याला सुवर्णयुग म्हणणे कितपत योग्य ठरणार आहे? चारशे वर्षांची प्रदीर्घ राजवट आंतरराष्ट्रीय व्यापारावरील वर्चस्व, आर्थिक सुबत्ता-साहित्य व कला क्षेत्रात असामान्य प्रगती या कसोट्या लावल्यास ते सुवर्णयुग ठरावे. पण या कसोट्या योग्य आहेत काय? यामध्ये सामान्यांच्या सहभागाचे काय? करिता सातवाहनकालाचे सर्व धागे-दोरे एकत्र करून महाराष्ट्राचे ऐतिहासिक योगदान स्पष्ट करण्याची आता वेळ आली आहे. सातवाहनांच्या विनाशानंतर महाराष्ट्रामध्ये अनेक राजघराण्यांचा उदय झाला. त्यापैकी क्षत्रपांचे एक घराणे होय. ते सातवाहनाप्रमाणेच नंतरच्या वाकाटकांचेही समकालीन होते. (इ. स. ४६ ते ३८७). त्यांचे महाराष्ट्रावर विशेषत्वाने पश्चिम महाराष्ट्रावर व पाश्चिमात्य व्यापारावर वर्चस्व होते. त्यांचे अनेक शिलालेख व नाणी उपलब्ध झाली आहेत. त्यांच्या या वर्चस्वाचा महाराष्ट्राच्या अनेक संस्थांवर निश्चित परिणाम झाला असला पाहिजे. तथापि ते अद्यापि अज्ञात आहे.

सातवाहनोत्तर काळात अभीर, वाकाटक, त्रैकुटक आदि सत्तांचा उदय झाला.

यापैकी केवळ वाकाटकांचा इतिहास थोड्याफार प्रमाणात प्रकाशात आला आहे. सातवाहनाप्रमाणे वाकाटकानीही महाराष्ट्रावर दीर्घ काळपर्यंत (२५० ते २५०) राज्य केले. त्यांचे सांस्कृतिक योगदानही श्रेष्ठ दर्जाचे आहे. पण वाकाटककालीन महाराष्ट्राचे चित्र अद्याप अस्पष्टच आहे. त्यांचे समकालीन असणाऱ्या अभिरांचे दहा राजे होऊन गेल्याचे व त्यांनी १३० वर्षांकरिता राज्य केल्याचे पुराणांनी म्हटले आहे. त्यांची नाणी व काही शिलालेख उपलब्ध झाले आहेत. अन्य शिलालेखातून त्यांची अपभ्रंशित नाणी आढळतात. नासिकपासून गाविलगडापर्यंतच्या प्रदेशावर त्यांचे राज्य होते. त्यांची लोकसंस्कृती अद्याप जिवंत आहे. तथापि इतिहासातील त्यांचे स्थान मात्र डळमळीत आहे. थोड्याफार फरकाने तीच परिस्थिती कलचुरी, चालुक्य, मौर्य व नळ, कदम्ब, शिलारादि घराण्यांची आहे.

थोडक्यात इ. स. ६ ते ११ व्या शतकातील महाराष्ट्राचे चित्र धूसर आहे. दुर्दैवाने याच काळात राष्ट्रकुटासारखे पराक्रमी घराणे महाराष्ट्रात होऊन गेले. रघुनाथरावाच्या अटकेच्या मोहिमेप्रमाणे त्यांनीही हिमालयापर्यंत मोहिमा काढून पाल-प्रतिहारावर जरब बसविली. भिन्न प्रसंगाचे संदर्भात त्यांनी शेकडो ग्रामे दान दिल्याचे त्यांच्या अनेक दानपटांद्वारे स्पष्ट होते. पण कोणत्या कारणास्तव त्यांना राजधानीचे वारंवार स्थलांतर करावे लागत होते ते समजू शकलेले नाही. महाराष्ट्रावर दोन शतकांहून अधिक काळ राज्य करून ते कोठेही आपल्या कारकीर्दीचा ठसा उमटवू शकले नाहीत. याची कारणे कोणती असावीत ते अद्याप कोडेच आहे. त्यांच्या काळातच महाराष्ट्राची एकीकडे भरभराट झाल्याची दिसते. कारण या काळात अनेक मंदिरे निर्माण झाली. अनेक भाषा निर्माण झाल्या. मराठी भाषेची जडण-घडण झाली. बहुढंगी साहित्य निर्माण झाले. राजधान्यांची भरभराट झाली. या सर्व घटना समृद्धी निदर्शक आहेत. तथापि ही भरभराट फसवी (psuedo) असल्याचे जाणवते. कारण त्याला अद्याप कोठेही पुरात्वीय आधार लाभला नाही.

या काळात झालेल्या राजवटींची आर्थिक परिस्थिती अत्यंत हलाखीची असावी असे नाण्यांच्या अभ्यासावरून वाटते. या दरम्यान झालेल्या कोणत्याच राजवटींची नाणी उपलब्ध झालेली नाहीत. त्यामुळे आंतरराष्ट्रीय व्यापारात मोठ्या प्रमाणात घसरण झाल्याचे जाणवते. सहाव्या शतकानंतर पाश्चिमात्य व्यापार बसला. याच कालखंडात युरोपात लघु हिमयुगाचा उद्भव झाला. त्यामुळे त्याच्या उत्पादनात व परिणामत: क्रयशक्तीत घट झाली आणि आंतरराष्ट्रीय व्यापार बसला म्हणून भारतातही बरीच पडझड झाली. आपल्याही हवामानात बदल होऊन दुष्काळाचे सातत्य वाढले आणि राष्ट्रकुटादि राजवटी यांच्या बळी ठरल्या काय ?

सरंजामदारीचा विकास हे या काळाचे आणखी एक वैशिष्ट्य मानावे लागेल. केंद्र सत्ता दुबळी ठरताच सरंजामदारांच्या संख्येत वाढ होत असे आणि भूप्रदेशाच्या अदला-बदलातून अनेक लहान-मोठी राज्ये उदयास येत असत. म्हणूनच राष्ट्रकुटांना

व यादवांना आपल्या राजधान्या बदलाव्या लागल्या असतील. सततच्या यादवीमुळे सामाजिक जीवनातले स्थैर्य नष्ट झाले असावे व भौतिक अधोगतीने दारिद्र्याची सीमारेषा ओलांडली असावी. म्हणूनच आपणास उत्खननात या कालातील भौतिक संस्कृतीचे पुरावे आढळत नाहीत. पण हे कसे शक्य आहे ? त्यांच्या वसाहतीचे काही तरी अवशेष मिळावयास हवेत. पण अद्याप तरी ते हाती आलेले नाहीत. ह्यू एनत्संपासून ते बाराव्या शतकातील प्रवाशांपर्यंतच्या वर्णनातून आपणास उजाड व उद्ध्वस्त नगरांची वर्णने आढळतात. त्यामुळे ही "अनागरीकरण" (de-urbanization) प्रक्रिया होती काय ?

यानंतरच्या यादव कालखंडावर उत्तमपैकी काम झाले असून त्यामध्ये एक प्रकारचा सुसंवाद साधला गेला आहे. यादवकालीन मंदिरांचे, यादव पुरातत्त्वांचे, वसाहतींचे आतापर्यंत अनेक पैलू प्रकाशात आले आहेत. या कालातील धार्मिक आंदोलनाने सारा समाज ढवळून गेला होता. नाथ, महानुभाव, वारकरी, वीरशैव, सुफी आदि धर्मसंप्रदायांच्या अभ्यासाने प्रगतीचे शिखर गाठले आहे. विशेषत: महानुभावांच्या योगदानावर चांगलाच प्रकाश आहे. त्यांच्या संशोधनाने समाजमानसात स्थान निर्माण केले आहे. अशा प्रकारची गती इतर क्षेत्रातही लाभली पाहिजे.

आतापर्यंतच्या चर्चेवरून आपल्या लक्षात आले असेल की महाराष्ट्र इतिहास लेखनाच्या दृष्टिकोनातून सातवाहनकाल व यादवकाल यावर तुलनात्मकदृष्ट्या विपुल संशोधन झाले आहे. त्यामुळे काही ज्येष्ठ संशोधकांनाही या दोन कालखंडातच महाराष्ट्र जागृत होता असे वाटते. परिणामी दरम्यानचा कालखंड उपेक्षित ठरला आहे. याकरिता या काळातील वस्तुस्थिती उजेडात आणणे हे तरूण संशोधकांसमोर मोठेच आव्हान आहे. डॉ. वाल्टरस्पिंकसारख्या अमेरिकन संशोधकाने वाकाटक काळातील अनेक पैलूंवर व्यापक प्रकाश टाकला आहे. पण हे सारे केवळ अजिंठा लेण्यांच्या अभ्यासासाठी करण्यात आले आहे. महाराष्ट्र केंद्र बिंदू मानून हा अभ्यास केल्यास इ.स. २५० ते ५५० या काळातील महाराष्ट्राचे चित्र स्पष्ट होईल. इ.स. ५५० ते १०५० या कालखंडाचा मागोवा घेणे क्रमप्राप्त ठरते.

मित्रहो, माझे भाषण लांबतच चालले आहे, तथापि आणखी काही अज्ञात क्षेत्राचा निर्देश करणे अगत्याचे वाटते. प्राचीन महाराष्ट्राच्या सामाजिक, आर्थिक, धार्मिक तसेच कला क्षेत्रातील निखळ इतिहासाचे काम होणे अद्याप बाकी आहे. या परिसरात शेकडो लेणी आहेत. लेणी ही तत्कालीन धर्म केंद्रे, विद्यापीठे व समाज जीवनाचा अभ्यास करणारी महत्त्वाची ठिकाणे होती. या दृष्टीकोनातून त्यांचा अभ्यास झाला पाहिजे. उत्तर प्राचीन कालखंडात महाराष्ट्रात शेकडो किल्ले निर्माण झाले. तथापि या दुर्गांचा शास्त्रशुद्ध अभ्यास झालेला नाही. महाराष्ट्रातील नागर संस्कृतीचाही सखोल अभ्यास करण्यास मोठा वाव आहे. याशिवायही अनेक क्षेत्रे आहेत. चर्चासत्रात आपण त्यांचा परिचय करून घेऊ या.

संशोधनाचे भरीव कार्य होण्याच्या दृष्टिकोनातून आणि संशोधनाचा दर्जा उंचावण्यासाठी काही उपयुक्त सूचना विचारार्थ ठेवाव्याशा वाटतात. अनुदान मंडळाने आपल्या धोरणात बदल करून संशोधनाची सेवा नियमाशी घातलेली सांगड तोडून टाकावी. संशोधन ऐच्छिक ठेवावे आणि त्याचा पदोन्नतीसाठी विचार करावा. सेवेतील पात्रता सिद्ध करण्यासाठी (Efficiency Bar) त्याचा विचार करावा. विद्यार्थ्यांच्या ज्ञानार्जनाच्या अपरिपक्व अवस्थेत केलेले संशोधन दोन्ही दृष्टिकोनातून निरूपयोगी असल्याचे आपण पाहिले आहे. व्यक्तिगत पातळीवर संशोधनाचे प्रयोग करण्याचे दिवस आता संपले आहेत. करिता संशोधन प्रशिक्षण संस्थेची निर्मिती करण्यात यावी. संशोधनात एकसूत्रता येण्यासाठी व त्यामधील पुनरावृत्ती टाळण्यासाठी सर्व परिषदांमध्ये समन्वय ठेवणारी एक संस्था असावी. या संस्थेस नियंत्रणाचे अधिकार असावेत. ही संस्था संशोधन क्षेत्रात पूरक भूमिका घेऊन झालेल्या कार्याची माहिती तालुका पातळीपर्यंत पोहोचविण्याचा प्रयत्न करेल. शिक्षक-प्राध्यापकांना त्यांच्या क्षेत्रात झालेल्या प्रगतीची माहिती देण्यासाठी शैक्षणिक शिबिरे घ्यावीत. महाराष्ट्र इतिहास लेखनाच्या अनुषंगाने अन्य राज्यातील संशोधनाचाही आढावा घ्यावा. प्रादेशिक (Regional) संशोधनाला प्राधान्य देण्यात यावे. त्याचा आरंभ ग्रामपातळीवरून करण्यात यावा. कालांतराने संबंधित विभागाचा सर्व इतिहास उपलब्ध होण्यास मदत होईल. अशा पद्धतीचा काही रचनात्मक कार्यक्रम राबविण्यास आशादायी चित्र निर्माण होण्याची शक्यता आहे. आशा करूया की तरुण पिढी याकडे विशेष आस्थेने पाहील. माझे लांबलेले भाषण आपण ऐकून घेतल्याबद्दल मी आपला आभारी आहे.

□ □ □

## ४.

# प्राचीन मंदिरशिल्पामधील विरहोत्कंठिता

**प्रा. डॉ. किरण देशमुख**
अर्जापूर, जि. नांदेड.

---

केवळ महाराष्ट्राच्याच नव्हे तर अख्ख्या हिंदुस्थानच्या कलाक्षेत्रात गोदाकाठच्या मराठमोळ्या मराठवाड्याचे महत्त्व अभिमानास्पद असेच आहे. कारण येथील वेरूळ (जि. औरंगाबाद), खरोसा (जि. उस्मानाबाद), अंबाजोगाई (जि. बीड) व शिऊर (जि. नांदेड) येथील लेण्यांमध्ये सुंदर शिल्पाकृती घडविलेल्या आहेत, तर अजिंठ्याच्या अप्रतिम चित्राकृतींनी सर्व जगातील कलारसिकांना आकर्षित केलेले आहे. उपरोल्लेखित लेण्यांशिवाय या प्रांती अन्वा, जामखेड (जि. औरंगाबाद), उमरगा, निलंगा (जि. उस्मानाबाद), बीड, धर्मापुरी (जि. बीड), औंढा, धारासूर (जि. परभणी) व्होट्टल, मुखेड, राहेर, येवती (जि. नांदेड) इत्यादी ठिकाणी मध्ययुगीन उत्तुंग देवालये आजही उभी आहेत. ती देवालये जशी उत्कृष्ट मंदिर-स्थापत्याने परिपूर्ण आहेत तशीच ती उत्तम शिल्पाकृतींनी जागोजाग सजलेलीही आहेतच.

येथील देवालयांवरील शिल्पकलेमध्ये प्रामुख्याने शैव-वैष्णव देवदेवतांच्याच विविध प्रकार-आकारातील प्रतिमा तळपतात, त्याचप्रमाणे मधाळ तारुण्य आणि मादक देहसौंदर्य असलेल्या नाना रूपातील स्त्रियांची शिल्पेही आढळतात. त्यामध्ये चित्तवेधक नृत्यांगना, मनोहारी सुस्वरूप सौंदर्यललना तसेच सुडौल पत्रलेखिकाही इथे कोरलेल्या आहेत. अर्थातच त्या विरळच दिसतात, म्हणूनच त्या लक्षवेधी झालेल्या आहेत.

मध्ययुगीन पत्रलेखिकांच्या प्रतिमा इथे आहेत - धर्मापुरी, धारासूर, लातूर, मार्कण्डी, कोल्हापूर व खिद्रापूरला! बीड जिल्ह्यातील अंबाजोगाई तालुक्यात धर्मापुरी हे एक छोटेसं गाव नांदेड-पुणे ह्या राजमार्गावर आहे. तेथेच गावाबाहेर असलेले केदारेश्वर

हे सर्वोत्कृष्ट देवालय आहे. त्या मंदिराचे बाह्यांग शैव-वैष्णव मूर्ती-शिल्पांनी खूपच सजलेले दिसते. त्या शिल्पावळीतच मोठ्या दिमाखात अशी उभी आहे - एक लोभस पत्रलेखिका !

येथील पत्रलेखिका पाठमोरी परंतु किंचित तिरकसपणे मोठ्या ऐटीने उभी आहे की त्यामुळे तिचे देहलावण्य आपल्यापैकी खऱ्या सौंदर्यरसिकाला अगदी व्यवस्थितपणे न्याहाळता येते. तिची उभी राहण्याची आकर्षक ढब प्रसंगानुरूप -

उभी न सन्मुख राहसी, जरी फिरवीसी पाठ।
दिठीं उठते पुलकावली कथित प्रीत निरगांठ॥

- अशी आकर्षक आहे.

येथील लेखिकेने स्वत:चा डावा पाय सरळ ठेवून, त्यावर आपला उजवा पाय देहुडाशैलीने मुडपून ठेविला आहे. ती त्रिभंगात उभी असून, तिने नाजूक कंठ, मोहक कटि आणि पिळदार पिंढऱ्या अशा तिन्ही ठिकाणी स्वत:ला मोठ्या कौशल्याने वाकवून आपले देहसौंदर्य अधिकच देखणे बनविण्याचा प्रयत्न केला आहे. लेखिकेचा संपूर्ण देह विविध प्रकारच्या नाजूक अलंकारांनी सजवून इथल्या अनामिक शिल्पीने तिचा सौंदर्यथाट अधिकच देखणा केला आहे. या लवचिक अंगकांतीच्या विरहिणीने आपल्या अंगावर कर्णवलय, गळाहार, कटिमेखला इत्यादी भरपूर दागिने घातले आहेत. तो साजशृंगार आणि तिचे देहसौंदर्य पाहून आपल्याला -

अलंकार हे घालता होईल सखये भार।
कशी साहशिल बाइ ग देह तुझा सुकुमार॥

असा प्रश्न सहजच तिला विचारावासा वाटतो. निसर्गत: लाभलेले सौंदर्य अधिकच खुलविण्यासाठी येथील तरुणी आपल्या अंगावर मुलायम वस्त्रांचा वापर करण्यात मोठी चतुर आहे. खरोखरच कवी कुलगुरू कालिदास व भासही चकित व्हावेत इतके भरपूर सौंदर्य व तारुण्य त्या मोहक पत्रलेखिकेजवळ आहे.

ह्या लेखिकेने आपल्या डोक्यावरील भागावर डाव्या हाताने एक पत्र आडवे धरलेले असून, उजव्या हाताच्या नाजूक बोटाने पकडलेल्या लेखणीने ती त्या पत्रावर मजकूर लिहित आहे. प्रियकराच्या मिलनासाठी उत्सुक असलेल्या ह्या तरुणीने आपले लिहिणे अपूर्णच ठेविलेले असून, हातातील पत्राचा शेवट कुठल्याशा गोड-गोड शब्दांनी करावा हे तिला सुचत नाही ! म्हणूनच तिचे पत्र लिहिणे थांबलेले आहे. यावेळचे तिच्या मनातील अनुरूप भाव कलाकाराने तिच्या लोभस चेहऱ्यावर अत्यंत उत्तम प्रकारे कोरलेले दिसतात. डौलदारपणे उभे राहणे व काटकोनात मान ठेवून हातातील पत्रावरच सर्व लक्ष केन्द्रीत करणे ह्या वरूनच तिची एकाग्रता आपल्याला जाणवते. कमनीय देहाची ही विरहिणी उंचेली आहे. परंतु दुर्दैवाने कुणा मूर्तिभंजकाने तिचे नाजुक हात व गुडघ्यापासून पुढील पाय भग्न केलेले आहेत.

अशीच दुसरी एक पत्रलेखिका आहे - परभणी जिल्ह्यातील धारासूर येथे! तेथील गुप्तेश्वराच्या मंदिराच्या मंडोवरावर ती उभी आहे! येथील लेखिका धर्मापुरीच्या लेखिकेपेक्षा ठेंगणी परंतु -

दिसे न सांधा जोड तो, विधि करि अति कटि क्षीण।
उरली ती भर घालुनी नितंब कुच अति पीन॥

- अशी रूपवान आहे.

तिने आपल्या उजव्या पायावर स्वत:चा संपूर्ण देहभार टाकला असून, डावा पाय किंचित तिरकसपणे पुढे ठेऊन उभे राहण्याचा दिमाख अतिशय व्यवस्थितपणे साधलेला आहे. या रूपगर्वितेच्या वाणीतील मधुरता सुरक्षित ठेवणारा तिचा नाजूक कंठ सुंदर असून, तिचे देहलावण्य 'दृष्टि न फिरे माघारी' इतके अप्रतिमच आहे. ही पत्रलेखिकाही सालंकृत आहे. तिच्या नाजूक चरणाभोवतीच्या पैंजणांचा मंजुळ निनाद तिच्या अज्ञात प्रियकराच्या हृदयाचा ठाव घेत असावा!

या सुडौल, सुस्वरूप लेखिकेने आपल्या डावीकडील वरील भागावर डाव्या हाताने एक पत्र आडवे धरलेले असून, ती त्याच्यावर उजव्या हातातील टोकदार लेखणीने लिहीत आहे. प्रियकराच्या भेटीसाठी व्याकुळलेल्या या सुंदरीनेही आपले पत्र अपूर्णच ठेविलेले दिसते. प्रियकराच्या भेटीसाठी अधीर झालेल्या या यौवनिकेच्या सुंदर मुखावर योग्य तेच भाव शिल्पकाराने अतिशय सजीवपणे साकारलेले आहेत!

मार्कण्डी हे ठिकाण नागपूरपासून २१६ कि. मी. अंतरावर चंद्रपूर जिल्ह्यात वैनगंगेच्या काठावर आहे. तेथे इ.स. ११व्या शतकातील मार्कण्डेय ऋषीचे हे एक भव्य देवालय उभे आहे. त्याच मंदिराच्या बाह्यांगावर उत्तराभिमुखी उभी आहे - आणखी एक सुंदर पत्रलेखिका!

कुसुम, कौमुदी आरसा, भासे तेज मवाळ।
अंगकांती अभिराम ती उसळे नयनिं झकाळ॥

असे अपूर्व सौंदर्य ल्यालेली येथील लेखिका आपला डावा पाय सरळ ठेवून, त्यावर गुडघ्यापासून मुडपलेला उजवा पाय तिरकस ठेवून अतिशय डौलदारपणे उभी आहे. ती नखशिखांत सजलेली असून -

कांचन द्युति तनु, कनक ते कळे न कांति स्नात।
जाणवती करभूषणें कठोर धरिता हात॥

असा तिचा अलंकारथाट आहे. तिची केशरचना व वेशभूषाही आकर्षकच दिसतात. या लेखिकेने स्वत:च्या कटिसमोर डाव्या हातात आडवे पत्र धरलेले असून, त्यावर ती उजव्या हातातील लेखणीने स्वत:च्या मनातील भावनांना अतिशय हळूवारपणे अक्षररूप देत आहे. तिच्या उजवीकडे खालीच शेजारी दौत घेतलेली तिची सखी उभीच आहे.

अशाच स्वरूपाच्या पत्रलेखिकांना अज्ञात सिद्धहस्त शिल्पीने खिद्रापूर, कोल्हापूर

येथील देवालयांवर तसेच लातूर येथील सिद्धेश्वर मंदिराशेजारील बारवेमध्ये आणि औरंगाबादला मराठवाडा - विद्यापीठाच्या इतिहास विभागातील, वस्तू-संग्रहालयात एका वैष्णवी शिल्पामध्ये सुरेखपणे कोरलेले आहे. पन्हाळगडावरील इतिहास-संशोधक श्री. मु. गो. गुळवणी ह्यांचे संग्रहामधील पत्रलेखिकेचे शिल्पही सुबक आहे.

सौंदर्य व तारुण्याने देखण्या बनलेल्या उपरोल्लेखित सर्वच पत्रलेखिकांना म्हणायचे - विरहोत्कंठिता ! कारण भरतमुनीने -

''अनेक कार्यव्यासङ्गात् यस्या नागच्छति प्रिय: ।
तस्यानागमदु:खार्ता विरहोत्कंठिता मता ॥

असे विरहाने व्याकुळ झालेल्या नायिकेचे वर्णन केले आहे. प्रियकराच्या विरहाने दु:खी झालेल्या स्त्रिया प्रतिकात्मतेने शिल्पकलेत सादर करण्यासाठी प्राचीन कलाकारांनी तिला पत्रलेखिकेच्या रूपात अतिशय सुंदर स्वरूपात मोठ्या कौशल्याने घडविलेले दिसते.

□ □ □

५.

# प्राचीन सिन्नरमधील आयरेश्वराचे मंदिर

**प्रा. कौतिक पवार**
जिजामाता महाविद्यालय, सटाणा,
जि. नाशिक

---

नाशिक-पुणे या पन्नास नंबरच्या राष्ट्रीय महामार्गावर वसलेले सिन्नर हे नाशिक जिल्ह्यातील तालुक्याचे ठिकाण. एकेकाळची राजधानी असलेले हे वैभवशाली नगर. जिल्ह्याच्या ठिकाणापासून दक्षिण-पूर्वेस २७.३५ कि. मी. अंतरावर असून, दक्षिणेस याच महामार्गावर ४० कि. मी. अंतरावर पायोधरा (प्रवरा) किनारी असलेले संगमनेर, पूर्वेस कोपरगाव तालुक्याची सरहद्द २५ कि. मी. वर आहे. उत्तरेस गोदावरीचा किनारा लाभलेला निफाड तालुक्याचा व नाशिक तालुक्याचा काही भाग, तर पश्चिमेस इगतपुरी व अकोला तालुक्यांच्या सरहद्दीचा भाग लागून आहे. इंग्रजी राजवटीत संगमनेर परगण्यात असलेले सिन्नर हे नगर १ जानेवारी १८६० रोजी नगरपालिका असलेले शहर बनले. पुढे जून १८७० मध्ये सिन्नरचा नाशिक जिल्ह्यात तालुका म्हणून समावेश झाला.

सिन्नर नगर हे सरस्वती नदीच्या काठावर वसलेले असून लगतच शिवनदी व देवनदी या नद्या वळसा घेऊन गावाच्या पूर्वेस या सरस्वतीस मिळून तिन्ही नद्यांचा संगम बनतो. अशाप्रकारे एकेकाळी वैभवसंपन्न असलेले सिन्नर हे नगर प्राचीनकाळी यादवनृपतींच्या राजधानीच्या नगराचा वारसा लाभलेले आहे. महानुभाव पंथाचे संस्थापक श्री चक्रधरस्वामी यांनी सिन्नरला भेट दिली तेव्हा हे नगर श्रीनगर म्हणून ओळखले जात होते. सिंदीनेर, सिंदीनगर, सेऊनपूर व श्रीनगर याप्रमाणे ग्रामनाम बदलत आलेले असून याच नावांमधून उच्चार बदलत जाऊन आज बोलीभाषेत 'सिंदर' म्हणून वापरले जाते. अर्थात तेच 'सिन्नर' नगर होय. अशाप्रकारे विभिन्न नावानी ओळखले जाणारे

एकमेव प्राचीन नगर म्हणजेच सिन्नर हे होय.

स्थानपोथी आणि लीळाचरित्रातील वर्णनांवरून आपल्या सहज लक्षात येते की, श्रीनगर अर्थात सिन्नर हे ऐश्वर्यपूर्ण असे नगर होते. घोड्यांच्या किंकाळ्या, झुलणारे हत्ती, ढोल-ताशांचा आवाज, माणसांचा गलबलाट आदी बाबींचे लीळाचरित्रामधील वर्णन एखाद्या राजधानीच्या नगरास शोभून दिसेल असे आहे. यात पुन्हा भर पडते ती स्थानपोथीमधील गोंदेश्वर, ऐश्वर्यश्वर आदी मंदिरांसह असलेल्या २५ मंदिरांच्या वर्णनाची! यावरून आपण असे म्हणू शकतो की, सिन्नर म्हणजेच मंदिरशिल्पांचे नगर होय.

यादव राजवटीपासून, मुसलमान राजवट, पेशवाई व इंग्रजी अमलापर्यंतचा सर्वांगिण अनुभवाचा ठेवा सिन्नरला लाभलेला आहे. आजही स्वातंत्र्यानंतर सिन्नर नगराला संरक्षणाच्या दृष्टीने विळख्यात घेणारा दगड-मातीचा परकोट आपले काही बुरूज व वेशी (दगडी प्रवेशद्वारे) यांच्यासह उभा आहे. यापैकी वावीवेशीचे महाद्वार अजूनही अभंग अवस्थेत आहे. संपूर्णपणे दगडी बांधकामाचा ते उत्कृष्ट नमुना आहे. नगराभोवती असलेल्या या परकोटाला १) नाशिक वेस, २) नायगांव वेस (गंगावेस), ३) बाजारवेस, ४) वावीवेस, ५) लोणारवेस (पडकीवेस) आणि संगमनेर वेस या प्रमुख वेशी आहेत. परकोटाची भिंत ही जवळजवळ २० फूट उंचीची आणि ५ फूट जाडीची आढळून येते. परकोटाच्या बाहेरील बाजूने पाण्याने भरलेल्या खंदकाचाही वापर करण्यात आलेला दिसून येतो. ज्या नगराची एकेकाळी राज्यकर्त्यांनी आपली राजधानी म्हणून निवड केली, तेच नगर आजच्या राज्यकर्त्यांपासून उपेक्षित अवस्थेत कसे बसे तग धरून आहे. या नगरातील "चौदा चौकी वाडा" या सारख्या वास्तू कालोघात कशा नष्ट झाल्या अथवा केल्या हा एक स्वतंत्र संशोधनाचा विषय आहे.

सिन्नर म्हणजे "मंदिरांचे नगर" असे म्हटल्यास वावगे होणार नाही. कारण देवालयांची स्थापना करण्याची प्रथा ही हिंदुस्थानात इ.स. पूर्व चौथ्या शतकापासूनच सुरू झालेली आढळते. त्यातल्या त्यात शिवलिंगपूजा ही अत्यंत प्राचीन आहे. ठाणे जिल्ह्यातील कल्याणजवळील अंबरनाथचे शिवमंदिर, धुळे जिल्ह्यातील साक्री तालुक्यात बाळसाने येथील शिवमंदिर, नाशिक जिल्ह्यातील बागलाण तालुक्यात देवळाणे व मालेगांव तालुक्यात झोडणे येथील शिवाचे देवालय, तर सिन्नर येथील आयेश्वर (ऐश्वर्यश्वर), गोंदेश्वर, चितळेश्वर, विठ्ठलेश्वर आदी देवालये ही मंदिर शिल्पप्रकारातील आदर्श नमुनेच आहेत. यापैकी गोंदेश्वर व आयेश्वर ही शिवालये उत्कृष्ट शिल्पकलेचे दर्शन घडवितात.

आयेश्वराचे देवालय हे सिन्नर नगराच्या वायव्य दिशेस सरस्वती नदीच्या दक्षिण किनारी ठाण मांडून आहे. पूर्वाभिमुख असलेले हे शिवालय मंदिर शिल्पकलेतील सिन्नरमधील आगळा-वेगळा वैशिष्ट्यपूर्ण नमुनाच आहे. विस्ताराने गोंदेश्वर मंदिराच्या तुलनेत लहान असले तरी शिल्पकलेच्या बाबतीत मात्र गोंदेश्वर मंदिरापेक्षा महान आहे. आयेश्वर मंदिराचा

बराचसा भाग पडलेला आहे. चौथऱ्याच्या तळाचा भाग पडझड झालेला आहे. सांप्रत मंदिराचा चौथरा हा ८.२० मीटर रूंदीचा असून त्याची लांबी १९.३५ मीटरची आहे.

पूर्व व उत्तर सीमेकडील चौथरा हा जमिनीपासून एक मीटर उंच असून पश्चिम व दक्षिण बाजू ही जमिनीच्या पातळीबरोबरच दिसून येते. सद्यःस्थितीत असलेले मुख्य मंदिर हे ५.६० मीटर उंचीचे आहे. सभामंडपात पूर्वेकडून प्रवेश करून पुढे जावे लागते. या मंडपाची उंची ४.६३ मीटर आहे. सभामंडपात एकूण आठ स्तंभ आहेत. या सर्वच मंडपस्तंभांची रचना ही अष्टकोनी, बाराकोनी व सोळाकोनी याप्रमाणे आढळते.

आयेश्वर मंदिराची रचना ही सभामंडप, अंतराळ (अर्धमंडप) व गर्भगृह (गाभारा) याप्रमाणे अस्तित्वात आहे. सभामंडपातील नंदीच्या चारी बाजूला असलेले दोन स्तंभातील अंतर पूर्व-पश्चिम २.१३ मीटर असून दक्षिण-उत्तर २.१५ मीटर आहे. या स्तंभांची उंची २.६४ मीटर आहे. उर्वरित सभा मंडपातील स्तंभातील अंतर विषम असे आढळून आले आहे. जसे प्रथमच्या दोन स्तंभांचे पूर्व-पश्चिम अंतर २.२७ मीटर तर दक्षिण-उत्तर अंतर २.२८ मीटर आहे. याचे पुढील स्तंभाचे पूर्व-पश्चिम अंतर नदीकडील स्तंभाचे १.६२ मीटर आहे तर दक्षिणेकडील बाजूच्या स्तंभाचे पूर्व-पश्चिम अंतर १.५९ मीटर आढळले आहे. तसेच दक्षिण-उत्तर अंतरही २.२७ मीटर आढळून आलेले आहे. प्रवेश करताना उजव्या बाजूला स्तंभाची उंची ही स्तंभाच्या तळापासून स्तंभ-शीर्षापर्यंत २.६६ मीटर आहे तर नंदीच्या वायव्य सीमेकडील स्तंभाची उंची २.६४ मीटर आढळून आली आहे. अशाप्रकारे सभामंडपाची लांबी ९.१४ मीटर व रूंदी ४ मीटर आहे. तर अंतराळ हे २.२२ मीटर x १६५ मीटर मापाचे आहे. दरवाजाची उंची १.५८ मीटर असून रूंदी ८३ सेंटी मीटर आहे. तीस सेंटी मीटर जाडीचा अखंड दगड उंबरटासाठी वापरला आहे. आयेश्वराचे गर्भगृह २ मीटर लांबीचे व २ मी. रूंदीचे असून पिंडीजवळून घेतलेली गर्भगृहाची उंची २.४४ मीटर आहे. दिवा ठेवण्यासाठी दगडी पट्टाही आहे.

आयेश्वर मंदिराचे अवशेष हे मंदिराच्या नावाप्रमाणेच नख-शिखांत ऐश्वर्याने नटलेले आढळतात; त्यावरूनच या मंदिराच्या शिल्पांचे महत्त्व सहज लक्षात येते. स्तंभावर शक्ती देवता, गणपती, गजलक्ष्मी, विष्णु, देव-देवता, अप्सरा, नृत्यांगनांची शिल्पे कोरलेली आहेत. पाऊस व ऊन वाऱ्याच्या तडाख्यामुळे बहुतेक शिल्पे ही झिजून नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत.

आयेश्वराच्या सभामंडपातील नंदीवर नक्षीकाम कोरलेले आहे. या मंदिराचे एक खास वैशिष्ट्य म्हणजे अर्धमंडपाच्या द्वारावर असलेले मकर तोरण होय. या मकर तोरणावर हंसमाला व नृत्यकांची गोलाकार मालिका आहे. तोरणाच्या मध्यभागी शिवाचे तांडवनृत्य कोरलेले असून सोबत पार्वती, कार्तिकेय व गणपतीही आहे. मकर तोरणाच्या खाली असलेल्या अर्धस्तंभावर उजव्या बाजूच्या स्तंभाच्या तळाला विष्णू असून डाव्या बाजूच्या स्तंभाच्या तळाशी ब्रह्मा आहे. छताच्या आठ समभागावर अष्टदिक्पाल कोरलेले आहेत.

मंदिराच्या प्रवेशद्वारावरील नक्षीकाम हे खरोखरच उत्कृष्ट आहे. द्वारपालासह, रति-मदन, भौतिक नक्षीकाम व मानवी आकृतीसह असलेले प्रवेशद्वाराच्या द्वारललाटावरील शेषधारी विष्णु व वरती असलेले गजलक्ष्मी अशा वैशिष्ट्यपूर्ण शिल्पाचे वेगळेच दर्शन घडते. याचबरोबर सप्तमातृकांचा पट्टा, कमळ पुष्पांचे नक्षीकाम हे द्वारललाटावरील शिल्पास शोभून दिसते. मंदिराच्या बाह्य अंगावर असलेले प्रतिकात्मक शिल्प, स्तंभ, शिखराचे प्रकार, कंगोरे, सिंहाकृती, पशु-पक्षी, पौराणिक कथांचे प्रसंग यावरून हे मंदिर चालुक्य शैलीच्या बांधकाम वैशिष्ट्यांची जाणीव करून देते. मंदिराच्या स्तंभावरील बहु अंशी शिल्पे ही वैष्णवी आहेत. शिवलिंग हे उत्तराभिमुख आहे.



६.

# वळग येथील तेलगु भाषेतील शिलालेख

**श्री. समुद्रगुप्त पाटील**
संचालक - भारत इतिहास मूलभूत शोध संस्था,
नांदेड.

---

मराठवाड्यातील वळग तालुका देगलूर जि. नांदेड या ठिकाणी हा शिलालेख सापडला आहे. जुने वळग गाव हे करडखेड मध्यम प्रकल्पाखाली गेले असून नवीन ठिकाणी आता त्याची वसाहत केली गेली आहे. या जुन्या गावात प्राचीन काळी दगडी घाणे वापरले जात असत; आणि या घाण्याशेजारीच मूर्ती ठेवण्यासाठी खाच असलेला व नरसिंह कोरलेला दगड ठेवलेला असे. यालाच त्या काळचे लोक घाणादेवी म्हणून पूजा करीत असत. त्यावर काही मजकूरही कोरलेला असे. असाच एक शिलालेख प्रस्तुत लेखकास वळग गावाच्या उत्खननात सापडला आहे. उभ्या महाराष्ट्रात नांदेड हा जिल्हा असा आहे की तेथे तेलगु व कानडी भाषिकांची वसती असून त्यांच्या संस्कृतीचा मराठी संस्कृतीवर प्रभाव पडल्याचे दिसून येते.

प्रस्तुतचा शिलालेख भगवान महावीर यांच्या मूर्तीखाली कोरलेला असल्यामुळे त्याला मूर्तिलेख असे म्हणता येईल. हा शिलालेख काळाच्या ओघात गुळगुळीत व काही ठिकाणी दगडाचे छिलके उडाल्यामुळे अस्पष्ट झाला आहे. तो तीन तुकड्यांत विभागलेला असून त्याची एकूण लांबी ७६ से. मी., उंची ३.५ से. मी., रूंदी ३४ से. मी. अशी आहे. शिलालेखाची काही अक्षरे कानडी लिपीसदृश्य दिसतात. शकाच्या ठिकाणचा छिलका उडाल्यामुळे शकाचा निर्देस समजू शकत नाही. प्रस्तुत लेखकास उत्खननात तेथेच भगवान महावीरांची मस्तक प्रतिमा मिळाली आहे. त्या प्रतिमेखालीच हा शिलालेख असावा.

या शिलालेखाची लिपी तेलगु, भाषा संस्कृत असली तरी प्राकृत अपभ्रंश भाषेतील 'सुंगडो' हा शब्द त्यामध्ये डोकावून जातो. शिलालेखात 'वर्मन' हे पद आले आहे. 'इस्क्रिप्शान फ्राम नांदेड डिस्ट्रिक्ट' या ग्रंथात तडखेल जैन शिलालेखात उल्लेखलेला राजा दुसरा सोमेश्वर याचा प्रधान कर्करासा हा सेनापती असून हा चालुक्य कल्याणी येथे राज्य करणाऱ्या राजाच्या काळचा हा शिलालेख आहे. यामध्ये निगलाम कमला जिनाल्यासाठी देगाव आणि तडखेल (ता. देगलूर) आणि करडखेडचा दंडनायक कलीमय्या यांनी राजा श्री सोमेश्वर दुसरा याच्या संमतीने हे दान दिले आहे.

हा वळग शिलालेख इ. स. १०४७ नंतरचा असावा. कल्याणी चालुक्य राजा पहिला सोमेश्वर याची प्रशस्ती असलेला आणि सेनापती नागवर्मा याने केलेल्या कार्याचे रसभरित वर्णन दुसऱ्या एका शिलालेखात आले आहे. (तेलगु लिपी व भाषा संस्कृत असलेला हा शिलालेख मराठवाडा विद्यापीठाच्या संग्रही आहे). याच नागवर्माने प्रस्तुत शिलालेख महावीराच्या मूर्तीखाली कोरलेला असावा. या सेनापतीचे घराणे जैन असावे. हा वाजी कुलोत्पन्न असून कौंडिण्य गोत्री आहे. शिलालेखाचे वाचन पुढीलप्रमाणे आहे -

(पहिली ओळ) - वैशाख शुद्ध १२ ....
(दुसरी ओळ) - या नाम धेय : ....
(तिसरी ओळ) - (सदा) व्याद / गुण गुण रत्नादि
(पुढील भाग)
...... तस्मीन सुंगडो जनी
पुस्तका (निका) र व्या
...............................
(त्या पुढील भाग)
वर्मेण (वर्मणा)
निर्मिता प्रतिमा
मेघचंद्रो पाधिष्टीत :

इ. स. १०७० च्या नंतर कधीतरी वाजी कुलोत्पन्न सेनापती नागवर्मा याने मेघचंद्र पाधी या जैन मुनीच्या सांगण्यावरून वैशाख शुद्ध द्वादशीस (शक नष्ट झाला आहे) श्री भगवान महावीराची मूर्ती स्थापन करून त्या खाली हा लेख कोरलेला आहे. या शिलालेखाचे ठसे दि. २२/११/१९८७ रोजी घेतलेले आहेत.

□□□

७.

# प्राचीन भारतीय राजसत्ता के बारे में सोमदेवसूरि के कुछ विचार

प्रा. कु. एस्. एन्. वड्डेपल्ली
बुर्ला महिला महाविद्यालय, सोलापूर

---

**प्राक्कथन** - आचार्य सोमदेवसूरि ने शुद्ध राजनीति प्रधान ग्रंथ का सृजन किया। सोमदेव का नीतिवाक्यामृत अर्थशास्त्र की कोटि का ही ग्रंथ है, जिसमें राज्यशास्त्र के समस्त अंगों पर पूर्ण प्रकाश डाला गया है। यद्यपि यह ग्रंथ कलेवर में कौटिलीय अर्थशास्त्र की अपेक्षा लघु है, किन्तु रचनाशैली में यह उसकी अपेक्षा सुंदर है।

आचार्य सोमदेव एक व्यावहारिक राजनीतिज्ञ थे। उन्होंने युद्ध एवं शान्तिकाल में राजा के सम्मुख उपस्थित होनेवाली समस्याओं और उनके समाधान का विशद विवेचन किया है। उन्होंने समाजशास्त्र एवं राज्यशास्त्र दोनों का ही विवेचन नीतिवाक्यामृत में किया है। उन्होंने ऐसे सिद्धांत निर्धारित किये हैं, जिनसे समाज एवं राज्य दोनो की ही उन्नति एवं विकास सम्भव हो सके। नीतिवाक्यामृत में अंतर्राष्ट्रीय सम्बधों पर भी विशद विवेचन हुआ है। षाड्गुण्यनीति का चित्रण अर्थशास्त्र के समानही किया गया है। सोमदेव के यशस्तिलक चम्पू महाकाव्य के तृतीय आश्वास में भी राजनीति का विशद वर्णन प्राप्त होता है। नीतिवाक्यामृत तथा यशस्तिलक के अध्ययन से सोमदेव की महान राजनीतिज्ञता प्रकट होती है।

भारत में राजनीतिशास्त्र के अध्ययन की परंपरा बहुत प्राचीन रही है। यह देश राजनीति के क्षेत्र में पाश्चात्य देशोंसे बहुत आगे था। आचार्य कौटिल्य तथा सोमदेव से बहुत पूर्व यहाँ अनेक महान् राजनीतिज्ञ हो चुके थे, जिनके मतों का उल्लेख महाभारत, कौटिलीय अर्थशास्त्र, कामन्दक के नीतिसार एवं नीतिवाक्यामृत की संस्कृत

टीका में प्राप्त होता है। अर्थशास्त्र के अनेक स्थलोंपर विशालाक्ष, इंद्र (बहुदन्त), बृहस्पति, शुक्र, मनु, भारद्वाज आदि प्राचीन राजशास्त्र प्रणेताओं के मत उद्धृत हैं। वर्तमान उपलब्ध राजनीतिक साहित्य में मनुस्मृति, शुक्र नीतिसार अर्थशास्त्र, कामन्दक का नीतिसार एवं सोमदेव का नीतिवाक्यामृत ही प्रमुख ग्रंथ है।

सोमदेवसूरीने 'नीतिवाक्यामृत' ग्रंथ में राजसत्ता के बारे में जो विचार दिये हैं, उन विचारोंपर दृष्टिक्षेप डाल्ने का यह एक अल्पसा यत्न है।

**राजा का महत्त्व** - राजा शद्ब का अर्थ प्रजा का रंजन करनेवाला, धर्म की मूर्ति तथा दीप्तिमान है और यही उसका सर्व प्रधान लक्षण एवं कर्तव्य है।

आचार्य सोमदेव ने दुष्टों का निग्रह करना तथा सज्जन पुरुषों का पालन करना राजा का परम धर्म बतलाया है। ''जैसे - सूर्य और चंद्रमा का उदय न होने पर समस्त प्राणी घोर अंधकार में डूब जाते हैं और एक-दुसरे को देख नहीं पाते हैं, इसीप्रकार राजा के अभाव में ये सारी प्रजाएँ आपस में लड-झगडकर बात की बात में नष्ट हो जायेंगी और बिन चरवाहे के पशुओं की भाँति दुःख के घोर अंधकार में डूब जाएगी।'' [१]

आचार्य सोमदेव ने राजा के महत्त्व का अनुभव एक सुंदर उदाहरण द्वारा उल्लेख करते हुए लिखा है कि ''जिन वृक्षों की जडे उखड चुकी है उनसे पुष्प-फलादि की प्राप्ति के लिए किया गया प्रयत्न सफल नहीं हो सकता ठीक उसीप्रकार राजा के नष्ट हो जाने पर प्रकृती वर्गद्वारा अपने अधिकार प्राप्ति के लिए किये गये प्रयत्न भी निष्फल होते हैं।'' [२]

राजा की उत्पत्ति किसप्रकार हुई उस संबंध मे भारतीय विचारकोंने सिद्धांतों का प्रतिपादन किया है, सोमदेवसूरि ने भी कई सिद्धांतों की चर्चा की है।

**राजा की योग्यता अथवा गुणों का विवेचन** - राजामें साधारण व्यक्ति की अपेक्षा महान् गुण होने आवश्यक हैं, क्योंकि वह जनता का स्वामी होता है। आचार्य सोमदेवसूरि ने राजा की योग्यताओं का बडे विस्तार के साथ वर्णन किया है। आचार्यद्वारा राजा के लिए निर्धारित योग्यताओं को हम दो भागों में विभक्त कर सकते हैं।

१) प्रथम कोटिमें राजा की राजनीतिक योग्यताएँ आती हैं। 'नीतिवाक्यांमृत' में राजा की इन योग्यताओं का वर्णन इसप्रकार किया है - ''राजा को जितेंद्रिय, महान पराक्रमी, नीतिशास्त्र का ज्ञाता, आन्विक्षिकी, त्रयी, वार्ता और दंडनीति आदि राजविद्याओंमें पारंगत, त्रयी (तीनों वेदों) का ज्ञाता, नास्तिक दर्शन का जाननेवाला, उत्साही, धर्मात्मा, स्वाभिमानी, विनम्र, न्यायी, प्रजापालक, साम, दंड और भेद आदि नीतिओं में प्रवीण तथा षाड्गुण्य (संधि, विग्रह, यान, आसन, संश्रय एवं द्वैधीभाव) के प्रयोग में दक्ष होना चाहिए।'' [३]

२) द्वितीय कोटि में उसकी सामान्य योग्यताएँ आती हैं, उनका वर्णन इसप्रकार

किया जा सकता है - "राजा को जितेंद्रीय, काम, क्रोध, लोभ, हर्ष, मान, मद इस अरि षड्वर्ग का विजेता, सदाचारी, विनयी, निरभिमानी, अक्रोध, कुलीन, क्षमाशील, गुणग्राही, दानी, गुरूजनों का सम्मान करनेवाला होना चाहिए।" [४]

३) राजा के लिए पराक्रम, सदाचार तथा राजनीतिक ज्ञान तीनोंही बातें राज्य को स्थायी बनाने के लिए परम आवश्यक है।

४) राजा के लिए बुद्धिमान एवं नीतिशास्त्र का भी ज्ञाता, न्यायी, पराक्रमी होना परम आवश्यक है।

"जिसप्रकार अग्निरहित केवल भस्म को साधारण व्यक्ति भी पैरों से ठुकरा देते हैं उसीप्रकार पराक्रमविहीन राजा के विरुद्ध साधारण व्यक्ति भी विद्रोह कर देते हैं। [५]

**राजा के दोषोंका विवेचन** - राजा के लिए आवश्यक योग्यताओं अथवा गुणों के साथ-साथ 'नीतिवाक्यामृत' में राजा के दोषों पर भी प्रकाश डाला गया है। १) क्रोध २) अभिमान ३) शास्त्रज्ञान से रहित होना ४) दुष्टता ५) मूर्खता ६) अनाचार और कायरता ७) दुराग्रह ८) व्यसनी ९) स्वेच्छाचारिता आदि राजा के भीषण दोषों के अंतर्गत आते हैं। १०) काम, क्रोध, लोभ, मद, मान, हर्ष ये राजाओं के छ: अन्तरंग शत्रु हैं। ११) आलस्य, अविश्वास, सेवकों को आश्रय न देना आदि राजा के दुर्गुणों मे सम्मिलित हैं।

इसप्रकार सोमदेवसूरि ने राजा के गुण-दोषों का बडे विस्तार के साथ वर्णन किया है।

**राजा के कर्तव्य** - वेदो में राजा को राष्ट्रों का सौंदर्य और राष्ट्र की शोभा बताया गया है। राजा के महत्त्व और उसके विशिष्ट कर्तव्यों के कारण ही उसके लिए इतना उच्च पद प्रदान किया गया था। अराजकता को नष्ट करने, प्रजापालन, देश में शांति और व्यवस्था स्थापित करने के लिए राजा की आवश्यकता प्रतित हुई यही राजा के कर्तव्य है।

**१) प्रजा की रक्षा एवं पालन-पोषण** - बाह्यशत्रुओं एवं आंतरिक राष्ट्रकष्टकों से प्रजा की रक्षा करना राजा का सर्व प्रमुख कर्तव्य है। शत्रुओंसे प्रजा की रक्षा के संबंध मे सोमदेव लिखते हैं की जो पुरूष (राजा) शत्रुओं पर पराक्रम नहीं दिखाता वह जीवित ही मृतक के समान है। प्रजा की रक्षा करना ही राजा का कर्तव्य नहीं, रक्षा के साथ ही साथ प्रजा का सर्वांगिण विकास करना भी उसका कर्तव्य है। राजा को प्रजा का पालन अपने कुटुंब के समानही करना चाहिए।

**२) सामाजिक व्यवस्था की स्थापना** - समाज की समुचित व्यवस्था करना भी राजा का कर्तव्य है। जिस समाज के व्यक्ति अपने धर्म का पालन नहीं करते वह समाज नष्ट हो जाता है। अत: राजा को वर्णाश्रम धर्म की व्यवस्था करनी चाहिए। राजा को यमराज के समान कठोर होकर अपराधियों को दंड देते रहना चाहिए। इससे

प्रजा के लोग अपनी-अपनी मर्यादाओं का उल्लंघन नहीं कर सकते। इससे राजा को धर्म, अर्थ और काम इन पुरुषार्थों की प्राप्ति होती है।

३) **आर्थिक कर्त्तव्य** - आर्थिक दृष्टी से प्रजा को संपन्न बनाना भी राजा का कर्त्तव्य है, क्योंकि सब प्रयोजनोंकी सिद्धि अर्थ से ही होती है। सोमदेव कृषि-कर्म, पशुपालन एवं कृषि के साधनों की उन्नति को समस्त सुखों की आधारशिला मानते हैं। प्रजा की आर्थिक स्थिती को ठीक रखने के लिए राजा को प्रजा पर अधिक कर नहीं लगाने चाहिए और न उससे अन्यायपूर्वक धन लेना चाहिए। व्यापार एवं वाणिज्य के विकास के लिए उसे समुचित नियमों की व्यवस्था करनी चाहिए और व्यापारियों की सुरक्षा का भी प्रबंध करना चाहिए।

४) **प्रशासकीय कर्त्तव्य** - देश की शासन व्यवस्था को सुचारू रूप से चलाने के लिए राजा को सुसंगठित सेना की स्थापना करनी चाहिए तथा विशिष्ट सैनिक गुणों से संपन्न व्यक्ति को सेनाध्यक्ष के पदपर नियुक्त करना चाहिए। आचार्य सोमदेव ने राज्य का मूल क्रम और विक्रम को बताया है। विक्रम अर्थात् शक्ति के अभाव में क्रमागत राज्य भी नष्ट हो जाता है। अत: राजा को अपनी सैनिक शक्ति सुदृढ बनानी चाहिए। ''जिसप्रकार जंगल से निकला हुआ सिंह गीदड के समान शक्तिहीन हो जाता है उसीप्रकार सैन्य एवं स्थानभ्रष्ट राजा भी क्षीण शक्तिवाला हो जाता है अत: राजा का यह कर्तव्य है की वह सर्वदा अपनी सैन्य शक्ति को सुदृढ बनाये रखे।''

राज्य की रक्षा के लिए कुशल विदेश-नीति का निर्धारण भी परम-आवश्यक है। उसके लिए राजा को साम, दाम, भेद तथा दंड आदि राजनैतिक गुणों का ज्ञान होना परम आवश्यक है। राजा को अपनेसे शक्तिशाली शत्रु से कभी युद्ध नहीं करना चाहिए।

५) **न्यायसंबंधी कर्त्तव्य** - राजा का यह भी एक परमकर्त्तव्य है कि वह पक्षपातरहित न्याय करें। इसके लिए उसे दंडनीति का ज्ञाता होना आवश्यक है। अपराधी को अपराधानुकूल दंड देना ही दंडनीति है। राजा के द्वारा प्रजा की रक्षा के लिए अपराधियों को दंड दिया जाता है, धन के लिए नहीं।

**राजरक्षा** - जिसप्रकार जीवनरक्षामें आयु मुख्य है उसीप्रकार राष्ट्र के सात अंगोंमे प्रजा की प्रधानता है। अत: राजा को अपनी रक्षा करनी चाहिए। राजा को सर्व प्रथम रानियोंसे, उसके बाद कुटुंबियों से और तत्पश्चात् पुत्रों से अपनी रक्षा करनी चाहिए। राजा को स्त्रियों के घर में कभी प्रविष्ट नहीं होना चाहिए। राजा को अपने ऊपर श्रद्धा रखनेवाले, भक्ति के बहाने से कभी विरुद्ध न होनेवाले, नम्र, विश्वसनीय एवं आज्ञाकारी सजातीय कुटुंबी तथा पुत्रों का संरक्षण करते हुए उन्हें उच्च पदोंपर नियुक्त करना चाहिए।

राजा को असंशोधित मार्ग में कभी गमन नहीं करना चाहिए। राजा को अपनी

भोजनसामुग्री को भक्षण करनेसे पूर्वअग्नि में डाल कर उसकी परीक्षा कर लेना चाहिए। इसीप्रकार वस्त्रादि की भी परीक्षा अपने आप्त पुरुषों से कराते रहना चाहिए। ऐसा करने से राजा का जीवन सदैव विघ्न बाधाओंसे सुरक्षित रहता है।

शत्रुओं से राजा को किसप्रकार अपनी रक्षा करनी चाहिए इस संबंध में भी सोमदेव ने कुछ निर्देश दिये हैं। "जिसप्रकार बिना नौका के केवल भुजाओं से समुद्र पार करनेवाला व्यक्ति शीघ्र मृत्यू को प्राप्त होता है, उसीप्रकार दुर्बल राजा बलिष्ठ के साथ युद्ध करनेसे शीघ्र नष्ट हा जाता है। अत: निर्बल को सबल शत्रु के साथ कभी युद्ध नहीं करना चाहिए।" आचार्य सोमदेव राजा को उसी समय युद्ध करने का परामर्श देते हैं, जब अन्य सभी उपाय असफल हो गये हो। इसप्रकार आचार्य सोमदेव ने राजा की रक्षा को बहुत महत्त्व प्रदान किया है क्योंकि राजा की रक्षा में ही सबकी रक्षा है।

**राजा का उत्तराधिकारी** - आचार्य सोमदेव ने इस बात की ओर भी संकेत किया है की राजा का उत्तराधिकारी किन-किन गुणों से विभूषित होना चाहिए। राजपुत्र को राजनीतिक ज्ञान और सदाचार रूप संस्कारों से सुसंस्कृत होना चाहिए। जिससे वह युवराजपद आरूढ होने के योग्य हो सके। शारीरिक मनोज्ञाकृति, पराक्रम, राजनीतिक ज्ञान, प्रभाव (सैन्य व कोश शक्ति से युक्त) और विनम्रता। राजकुमारोंमें विद्यमान ये सद्गुण उन्हें भविष्य में प्राप्त होनेवाली राज्यश्री के सूचक चिन्ह हैं।

**राजत्त्व के उच्च आदर्श** - प्राचीन कालमें राजा और प्रजा का संबंध पिता और पुत्र के समान था। कौटिल्य प्रजाहित को ही सबसे अधिक महत्त्व प्रदान करते हैं और उसीमें राजा का हित बताते हैं।

आचार्य सोमदेवसूरि के अनुसार "प्रजापालन ही राजा का यज्ञ है, प्राणियों का बध करना नहीं।"[६] वे प्रजारंजन के पक्ष को सबसे अधिक महत्त्व देते है। राजा का प्रत्येक कार्य जनहितपर आधारित होना चाहिए और वह सदैव प्रजा के सुख एवं समृद्धि के लिए प्रयत्नशील रहें।

जिसप्रकार व्यक्ति अपने कुटुंब के सुख-दु:ख, हानि-लाभ की चिंता में निरत रहता है, उसीप्रकार राजा को भी भूमंडल के प्राणियों की रक्षा, पालन-पोषण अपने कुटुंब के समान ही करना चाहिए। आचार्य सोमदेव का कथन है की राजा देव, गुरू एवं धर्म कार्यो को भी स्वयंही देखें। राजा वृद्ध, बालक, व्याधित और रोगी पशुओं का बांधवों के समान पोषण करें। इसप्रकार आचार्य सोमदेव प्रजा की हरप्रकार से रक्षा करने तथा उसका संवर्धन करनाही राजा का सबसे बडा धर्म मानतें हैं।

प्राचीन धर्मशास्त्रों एवं अर्थशास्त्रों में राजा का जन्म ही प्रजा की सेवा एवं उसका हरप्रकार से हित चिंतन करने के लिए बतलाया है।

याज्ञवल्क्य का कथन है कि राजा को अपनी प्रजा तथा सेवकों के साथ पिता के समान आचरण करना चाहिए। रामायण में भी ऐसा वर्णन है की राम ने अपनी

प्रजा के साथ पितृवत व्यवहार किया। सम्राट अशोक के द्वितीय कलिंग लेख से विदित होता है की उसने अपने शासन में पितृत्व के सिद्धांत का किस सीमातक व्यवहृत किया। ''जिसप्रकार में अपनी संतति को चाहता हूँ कि वह सबप्रकार की समृद्धी और सुख इस लोक और परलोक में भोगे ठीक उसीप्रकार मैं अपनी प्रजा के सुख एवं समृद्धि को भी कामना करता हूँ।'' यह पितृत्व का उत्तरदायित्त्व केवल राजातक ही सीमित नहीं था, अपितु अशोक ने अपने कर्मचारियों को भी यह आदेश दे रखा था कि व प्रजा की भलाई का पूर्ण ध्यान रखें और उससे पुत्रवत्ही व्यवहार करें।

सोमदेव प्रजा की सर्वतोमुखी उन्नति करना राज्य का उद्देश बतलाते है। राजा को प्रजा के सम्मुख उच्च आदर्श उपस्थित करना चाहिए, जिससे प्रजा का नैतिक उत्थान हो सके। आचार्य सोमदेव का आदेश है कि राजा को सर्वदा मर्यादा का पालन करना चाहिए क्योंकि मर्यादा का अतिक्रमण करने से फलवती भूमि भी अरण्यतुल्य हो जाती है। सोमदेव का कथन है की, ''यदि समुद्र ही अपनी मर्यादा का उल्लंघन करने लगे तथा माता अपने बच्चे का पालन धर्म छोडकर उसका भक्षण करने लगे, तो उन्हें कौन रोक सकता है। इसीप्रकार राजा भी यदि अपना धर्म (शिष्टपालन तथा दृष्ट-निग्रह) छोडकर प्रजा के साथ अन्याय करने लगे तो उसे दंड देनेवाला कौन हो सकता है, अर्थात कोई नहीं। अत: राजा को प्रजा के साथ कभी अन्याय नहीं करना चाहिए।'' [७]

इसप्रकार आचार्य सोमदेव ने राजत्व के उच्च आदर्श अपने ग्रंथ में व्यक्त किये है। वे राजा को अपने धर्म का आचरण करने, मर्यादा का पालन करने तथा प्रजा की हर प्रकारसे रक्षा करने और उसका पालन-पोषण अपने कुटुंब के समान करने का आदेश देते है।

## संदर्भ


१. - आचार्य सोमदेवसूरि - 'नीतिवाक्यामृत'
२. - आचार्य सोमदेवसूरि
३. - आचार्य सोमदेवसूरि - 'नीतिवाक्यामृत'
४. - आचार्य सोमदेवसूरि - 'नीतिवाक्यामृत'
५. - आचार्य सोमदेवसूरि
६. - आचार्य सोमदेवसूरि - 'नीतिवाक्यामृत'
७. - आचार्य सोमदेवसूरि

डॉ. एम. एल. शर्मा - 'नीतिवाक्यामृत में राजनीति' भारतीय ज्ञानपीठ प्रकाशन - ३६२०/२१, नेताजी सुभाष मार्ग, दिल्ली- ६ प्रथम संस्करण - सितंबर १९७१







८.

# रत्नागिरी जिल्ह्यातील किल्ले आणि तेथील पाण्याची साधने

श्री. र. रा. बोरकर,
पुरातत्त्व विभाग, रत्नागिरी.

---

रत्नागिरी जिल्ह्यात एकूण २७ किल्ले आहेत. ह्यांत गिरीदुर्ग डोंगरी किल्ले, जलदुर्ग आणि गढी किल्ले अशाप्रकारे तीन स्थल प्रकारांतील किल्ले आहेत. आजपर्यंत रत्नागिरी जिल्ह्यात २५ किल्ले असल्याचे समजले जात होते; आणि तशा प्रकारची माहिती संदर्भ अनेक ग्रंथात नमूद केली आहे. परंतु प्रस्तुत लेखकाने अलिकडेच नवीन दोन किल्ल्यांचा शोध घेऊन रत्नागिरी जिल्ह्यातील किल्ल्यांच्या यादीत नवीन दोन किल्ल्यांच्या नावाचा समावेश केला आहे. त्यांची नावे अशी - १) पालदुर्ग तालुका- खेड, २) कोळकेवाडी दुर्ग, तालुका- चिपळूण. हे दोन्ही किल्ले गिरीदुर्ग ह्या प्रकारातील आहेत.

गिरीदुर्ग - रत्नागिरी जिल्ह्यातील गिरीदुर्गात एकूण १३ किल्ल्यांचा समावेश होतो. ते पुढीलप्रमाणे - १) मंडणगड तालुक्यातील मंडणगड, २) दापोली तालुक्यातील पन्हाळेदुर्ग, खेड तालुक्यातील ३) पालगड, ४) महिपगड, ५) रसाळगड, ६) सुमारगड आणि नव्याने शोधलेला ७) पालदुर्ग, चिपळूण तालुक्यातील ८) भरवगड, ९) गोवळकोट आणि नव्याने शोधलेला १०) कोळकेवाडी दुर्ग, संगमेश्वर तालुक्यातील ११) प्रचीतगड, १२) मैमतगड आणि १३) भवानगड

**२) जलदुर्ग** - जिल्ह्यातील जलदुर्गांत एकूण १२ किल्ल्यांचा समावेश होतो : १) हर्णे येथील सुवर्णदुर्ग, तालुका- दापोली, हा किल्ला समुद्रात बांधलेला आहे. बाकीचे किल्ले सुवर्णदुर्गाप्रमाणे समुद्रात बांधले नसले तरी ते समुद्र-किनारी उभारलेले आहेत

आणि समुद्राचे पाणी यांच्या तटबंदीस भिडते. म्हणून हे किल्ले सुद्धा "जलदुर्ग" ह्या किल्ले प्रकारात येतात. ह्या प्रकारातील किल्ल्यांत एकूण ११ किल्ल्यांचा समावेश होतो. ते पुढीलप्रमाणे २) बाणकोट, तालुका-मंडणगड, दापोली तालुक्यातील ३) फत्तेगड, ४) कनकदुर्ग, ५) गोवाकिल्ला, गुहागर तालुक्यातील ६) अंजनवेल, ७) विजयदुर्ग, रत्नागिरी तालुक्यातील ८) जयगड, ९) रत्नदुर्ग, १०) पुर्णगड, आणि राजापूर तालुक्यातील ११) आंबोलगड, १२) यशवंतगड

**गढी किल्ले -** गढी किल्ले प्रकारात दोन किल्ल्यांचा समावेश होतो- १) राजापूर किल्ला, तालुका-राजापूर, २) साटवली, तालुका-लांजा.

**पाण्याची साधने -** रत्नागिरी जिल्ह्यातील किल्ल्यांत दैनंदिन वापरासाठी आवश्यक असलेल्या पाण्याची साधने म्हणून प्रामुख्याने खालील प्रकार दिसतात - १) विहिरी- बांधलेल्या / न बांधलेल्या, २) तलाव, ३) बांधीव टाके / तळी आणि ४) डोंगरात कोरलेली तळी. अशी चार प्रकारची साधने किल्ल्यांत दिसतात.

उपरोक्त साधनांपैकी डोंगरात कोरलेली तळी ही फक्त गिरीदुर्गातच आहेत. ती समुद्र-किनाऱ्यावरील किल्ल्यांत किंवा जलदुर्गात नाहीत. समुद्र-किनाऱ्यावरील किल्ल्यांस गिरीदुर्गाप्रमाणे पर्वतकडा असतानासुद्धा तळी कोरण्याचे टाळले आहे. त्यात फक्त विहिरी, तलाव आणि बांधीव टाकी दिसतात. ह्या लेखाचा मुख्य उद्देश कोरीव तळ्यांचा उहापोह करणे हा आहे.

**गिरीदुर्गातील घई -** प्रामुख्यांनी गिरीदुर्गांत कोरलेली तळी ह्या घई ह्या स्थानिक नावाने ओळखली जातात. ही तळी डोगरांच्या कड्यांनी कोरलेली आहेत. त्यांची रचना व आकार ह्यात विविधता आहे. त्यांची रचना व कोरण्याची पद्धत ही गुंफा स्थापत्यासारखीच आहे. त्यात पाणी सांचलेले असते म्हणून त्यास तळी म्हणायचे अन्यथा त्यांची रचना हुबेहुब गुंफा सारखीच आहे. काही तळ्यांना एक दोन किंवा तीन स्तंभ तळ्याच्या आकाराप्रमाणे कोरलेले आढळतात. ही एकास्म स्तंभाची रचना आहे. कोरलेले डोंगर आणि त्यांची कपारं आत कोसळू नये किंवा त्यांचे काही पाषाण सुटून ते टाक्यांत पडू नये तसेच तळ्यास बळकटी यावी याकरिता अशा प्रकारच्या स्तंभाची रचना केलेली दिसते. ही तळी डोंगराच्या कडांनीच कोरण्यामागील उद्देश डोगरांवरील पाणी झिरपून ते तळ्यात साठावे व त्यात मुबलक पाण्याचा साठा व्हावा, हाच दिसतो.

अशा प्रकारच्या घई (कोरीव तळी) पुढील किल्ल्यांत आढळतात - १) पालदुर्ग, तालुका- खेड, २) कोळकेवाडी दुर्ग, तालुका- चिपळूण, ३) भैरवगड, तालुका- चिपळूण, ४) प्रचीतगड, ५) भवानगड, ६) मैमतगड, तालुका- संगमेश्वर. ह्यात अनुक्रमे ६,९,१,५,४ आणि ७ ह्या संख्येत घई कोरलेल्या आहेत. ह्या घईच्या आकारात व प्रकारात विविधता आहे. तसेच त्यांचा उपयोग सुद्धा वेगवेगळ्या कारणांकरिता केला जात असावा, असे त्यांच्या स्थापत्य प्रकारावरून वाटते.

**आकार** - घईच्या आकाराप्रमाणे त्यांची तीन भागात विभागणी केली आहे - सर्वात मोठे, मध्यम व लहान आकारातील. त्यांची मोजमापे पुढीलप्रमाणे आहेत. सर्वच तळ्यांची उंची १.३० ते २.०० मीटरच्या दरम्यान आहे.

| १) आकार | २) आकार | ३) आकार |
|---|---|---|
| ११ x ८ मीटर | ९.०० x ७.०० मीटर | ५.०० x ५.०० मीटर |
| १३ x ९ मीटर | ८.४० x ८.३० मीटर | ४.६० x २.५० मीटर |
| | ७.६० x २.०० मीटर | ४.२० x २.१० मीटर |
| | ७.०० x ६.०० मीटर | ३.३५ x २.५० मीटर |
| | ७.६० x ३.८० मीटर | ३.१० x २.१० मीटर |

**स्तंभाचे प्रकार** - घईत एकारमात कोरलेले स्तंभ दोन प्रकारचे आहेत - १) चतुशकोनीस्तंभ शीर्षसहित आणि २) चतुशकोनीस्तंभ शीर्षविरहीत. स्तंभशीर्षात सुद्धा दोन प्रकार दिसतात त्यापैकी- १) पाटाशीर्ष स्तंभ २) पाकळीशीर्ष स्तंभ

**स्तंभांचे प्रकार**



चतुष्कोनी शीर्षविरहित



पाटा शीर्ष स्तंभ



पाकळी शीर्ष स्तंभ

ह्या घईत काही दोन खोल्यांच्या तर काही एकाच खोलीची आढळतात. तसेच त्यांच्या मुखाच्या आकारातसुद्धा विविधता दिसून येते. काहींचे मुख अगदीच लहान १ x १ फूट आकारांचे परंतु आतील भागाचा विस्तार मोठा असतो. काही घईंचे मुख ५ x ५ फूट लांबी रुंदीचे आहे. ह्यावरून असे निदर्शनास येते की ह्या घई भिन्न-भिन्न उद्देश नजरेस ठेवून वेगवेगळ्या उपयोगाकरिता कोरल्या होत्या. १ x १ फूट मुखाच्या घई ह्या एकाच खोलीच्या आहेत. त्यांचा उपयोग केवळ पिण्याच्या पाण्याकरिता केला जात असावा. तसेच झाडांचा पालापाचोळा व घाण या घईत जाऊ नये, घईतील पाणी दूषित होऊ नये, म्हणून त्याचे मुख लहान आकाराचे ठेवले जात असावे. मोठ्या तोंडाची घई ह्या दोन खोल्याच्या आहेत. एका खोलीत पाणी असते तर दुसरीत पाणी नसते. ह्यावरून अशा प्रकारच्या घईचा उपयोग स्नानाकरिता केला जात असावा. इथे वस्त्र बदलण्याकरिता सुद्धा वेगळी व्यवस्था केलेली आहे. काही घईंचा आकार व मुख मोठे असते. ह्या घईंचा उपयोग जनावरांना पाणी पाजण्याकरिता केला जात असावा.

ह्या घईपैकी काहींची विशेष सजावट केलेली आहे. त्यांचे बाह्यांग भौमितिक नक्षींनी अलंकृत केले आहे. अशा प्रकारच्या घई विशेष व्यक्तीच्या वापराकरिता उपयोगात आणल्या जात असाव्यात. इथे कोरलेली भौमितीक नक्षी प्रकार हा या जिल्ह्यातील कर्णेश्वर मंदिरात (तालुका- संगमेश्वर) कोरलेला आहे. त्यावरून ह्या किल्ल्यांच्या बांधणीचा कालखंड निश्चित करण्यास मदत होते. अशा प्रकारच्या घई कोरीत असताना शैलगृह कोरण्याच्या पद्धतीचाही पुरेपूर उपयोग केलेला दिसतो.

□□□

9.

# Socio-economic Study of Ancient India

**Prof. G. L. Bhide,** M. A.
Dayanand Colleg. of Arts and Science, Solapur.

---

The study of both the religious as well as secular Architecture is essential to understand the human life and society in Ancient India. Almost all the works on Indian architecture primarily deal with religious architecture in general and temple architecture in particular. The study of secular architecture is also essential to know the socio-economic life of the people in Ancient India. From the beginning of this century a band of trained archaeologists started working in the field and succeeded in carrying out hundreds of excavations throughout the country. They are responsible for bringing forth a maze of structural remains dug-out from the earth. The hidden treasury of Indian secular architecture had been exposed and made visible to all. So there is a need to study these structural remains from excavated site for knowing the socio-economic condition of Ancient India. In early Indian literature we read frequently of "मनुष्यालय, गृह, आगार, प्रासाद, दुर्ग, ग्राम, सन्निवास" along with description of villages and cities with their variety of houses meant for the dwelling of mere mortals. It is, therefore, easy to postulate that there was a secular architecture in Ancient India side by side, the religious architecture. But since secular architecture was built almost in relatively impormanent material like bamboo, straw, cane etc. time devoured them without leaving any trace behind. The internal conflicts and foreign invasions are also responsible for the


EARLY HISTORICAL SITES
SCALE OF MILES
SAR DHERI
TAKHT-I-BAHI
JAMALGARHI
CHARSADA
SAHRI-BAHLOL
TAXILA
MANIKYALA
R. RAVI
R. SUTLEJ
R. INDUS
TOR DHERAI
SUNET
RUPAR
JAGATGRAM
KURUKSHETRA
SIRSA
HISSAR
HANSI
HASTINAPURA
TOSHAM
DELHI
AHICHCHHATRA
BAIRAT
MATHURA
SAMBHAR
RAIRH
PIPRAWA
RUMMINDEI
SAHETH-MAHETH
KASIA
LAURIYA-NANDANGARH
BASARH
GAUHATI
R. YAMUNA
R. GANGA
BRAHMANABAD
MIRPUR KHAS
R. LUNI
PAWAYA
NAGARI
KAUSAMBI
BHITA
RAJGHAT
SARNATH
PATNA
NALANDA
RAJGIR
BODHGAYA
BANGARH
PAHARPUR
MAHASTHANGARH
MAINAMATI
LALMAI HILLS
MANDASOR
BHARHUT
BESNAGAR
UJJAIN
SANCHI
TRIPURI
MOTA MACHIALA
AMRELI
BARODA
MAHESVAR
TAMLUK
R. TAPTI
R. MAHANADI
BAHAL
NAGPUR
NASIK
SISUPALGARH
BOMBAY
R. GODAVARI
KONDAPUR
SALIHUNDAM
HYDERABAD
BRAHMAPURI
AGGAYYAPETA
NAGARJUNAKONDA
AMARAVATI
PAKHLIHAL
MASKI
HAMPI
BRAHMAGIRI
CHANDRAVALLI
ARABIAN SEA
BAY OF BENGAL
MADRAS
SENGAMEDU
ANCIENT SITES
ANCIENT SITES WITH N.B.P. WARE
MODERN CITIES

फौजा समोरासमोर छावणी करून उभ्या ठाकल्या असता लढाईच्या आदल्या रात्री सेनापती धनाजी जाधवाच्या राहुटीत त्याच्यासमवेत खंडो बल्लाळ, बाळाजी विश्वनाथ, नारो राम व अंबाजी पुरंदरे यांची एक गुप्त बैठक होऊन एक महत्त्वाची मसलत ठरली. धनाजीने शाहूराजा हाच खरा राज्याचा वारसदार आहे हे मान्य केले आणि होऊ घातलेल्या लढाईत आपण मनापासून लढणार नाही, योग्य समय येताच शाहूराजांच्या दर्शनास येऊ असे आश्वासन दिले. खंडो बल्लाळने शाहूराजांच्या छावणीत जाऊन धनाजीशी पक्की मसलत झाल्याची खबर पोहचती केली.[५] धनाजीच्या राहुटीत शिजलेल्या या मसलतीची बातमी इतकी गुप्त राखली गेली की त्याच्या बरोबरीच्या परशुराम पंडितास तिची खबर लागली नाही! परशुराम पंडिताप्रमाणे ताराबाईंशी खरे एकनिष्ठ असणारे खंडोजी दाभाड्यांसारखे अन्य सेनानीही अंधारात राहिले.

दुसरे दिवशी लढाईस तोंड फुटले आणि ताराबाईंच्या फौजांची दाणादाण उडाली! प्रतिनिधीचा जबर पराभव होऊन त्यास पळ काढावा लागला. खंडोजी दाभाडे कैद झाला. (१२ ऑक्टो. १७०७). चिटणीस बखर या लढाईचे वर्णन करताना म्हणते- ''महाराज लढाईस सिद्ध जाले. धनाजी जाधव व प्रतिनिधी चाल करून आले. परसोजी भोसले व चिमणाजी दामोदर यांनी घोडे चालवून लढाई केली. महाराजांनी चालून घेतले. प्रतिनिधी वगैरेंचा मोड होऊन पळून गेले. त्यांचे दहा-पाच हजार स्वार सापडले. सेनापतीनी आपले विचारातील सर्वास घेऊन घोड्यावरून उतरून मुजरे करून भेटले. महाराजांनी खेडच्या मैदानी मुक्काम केला. लोकांनी कामे केली त्यांस बहुमान बक्षीस दिल्हे. दुसऱ्या दिवशी सेनापतीच्या भेटी सन्माने करून जाल्या. सुमुहूर्तावर सेनापतीस पदाची वस्त्रे व बहुमान दिला. खंडो बल्लाळ यासही चिटणीसी वस्त्रे दिली.''[६]

खेडच्या लढाईत रणमैदानावर ज्या फौजांचे नेतृत्व धनाजीने केले, त्यांचा पराभव होताच त्याने प्रतिस्पर्धी फौजेच्या नायकास मुजरा करावा, ही मराठ्यांच्या इतिहासातील नाट्यमय घटना होती! ताराबाईंचा हा सेनापती रणांगणावर पाय रोवून निष्ठेने लढता तर शाहूराजास विजय मिळणे अवघड होते. याचा अर्थ खेडच्या लढाईचा निर्णय ना ताराबाईंच्या हाती ना शाहूराजांच्या हाती होता. तो सेनापती धनाजी जाधवाच्या हाती होता. सारांश, इतिहासाला कलाटणी देणारा निर्णय धनाजी घेणार होता, आणि तशी कलाटणी देऊन त्याने इतिहासाचा प्रवाह शाहूराजाच्या बाजूने वळविला होता. हिंदुस्थानातील इंग्रजी साम्राज्याच्या इतिहासात प्लासीच्या लढाईला जसे महत्त्व आहे तसे मराठ्यांच्या इतिहासात खेडच्या लढाईला आहे!

खेडच्या विजयानंतर शाहूराजे आपल्या फौजा घेऊन पुणे प्रांतातील ठाणी-किल्ले काबीज करीत साताऱ्याच्या पायथ्याशी आले; आणि सातारा काबीज करून गडावरील परशुराम पंडितास त्यांनी कैद केले. लवकरच त्यांनी स्वत:ला राज्याभिषेक करवून घेऊन अष्टप्रधानांच्या नेमणुका केल्या आणि पन्हाळ प्रांती असलेल्या ताराबाईंच्या पारिपत्यासाठी ते माहिमेवर रवाना झाले. (मार्च - जुलै १७०८). या सुमारास धनाजी पुणे-जुन्नर

प्रांतात मोहिमेवर होता. ही मोहीम संपवून शाहूराजांच्या भेटीस पन्हाळ प्रांताकडे येत असता वारणा नदीच्या काठी वडगाव येथे मराठ्यांचा हा महान सेनानी स्वर्गवासी झाला. (जुलै १७०८)

## धनाजीने शाहूराजांच्या बाजूने डौल का दिला?

खेडच्या रणमैदानावर मराठी राज्याच्या सेनापतीने घेतलेला निर्णय हा त्याचा स्वामीद्रोह की स्वामीसेवा, असा प्रश्न निर्माण होतो. या प्रश्नाचे उत्तर इतिहासकार स्वराज्याचा वारसदार कोणाला मानतात यावर अवलंबून आहे. ताराबाईपुत्र शिवाजीराजे हेच खरे वारसदार मानले तर धनाजीचे हे कृत्य निःसंशय स्वामीद्रोहाचे व विश्वासघाताचे ठरते. पण शाहूराजे हे स्वराज्याचे खरे वारसदार मानल्यास धनाजीची कामगिरी स्वामीसेवेची व तत्त्वनिष्ठेची ठरते. मराठा इतिहासातील हे वादग्रस्त स्थळ आहे!

खंडो बल्लाळ, बाळाजी विश्वनाथ इत्यादी मंडळींनी धनाजीचे मनपरिवर्तन केले व शाहूराजे हेच खरे स्वराज्याचे धनी आहेत हे त्याच्या मनावर बिंबविले हा इतिहासकारांचा अन्वयार्थ भाबडा आहे;[७] अथवा खुद्द ताराबाईंनी पुढे धनाजीपुत्र चंद्रसेन यास आपल्या पक्षात ओढण्यासाठी जे पत्र लिहिले आहे त्यात म्हटले आहे की सेनापती जाधवरावास (धनाजीस) ''विपरीतकालवशे एकप्रकारे मोह प्राप्त झाला होता'' हेही खरे नाही. धनाजी हा मातबर सेनानी व मुत्सद्दी आहे. शिवाजी महाराजांपासूनच्या कारकिर्दी त्याने अनुभवलेल्या आहेत. मराठी राजकारणात तो मुरलेला राजकारणी आहे. त्यास कोणी खंडो बल्लाळ अथवा बाळाजी विश्वनाथाने मसलत सांगावी आणि त्यात त्यास ओढावे असा काही प्रसंग घडला असेल असे वाटत नाही.

राज्यावर शाहूराजाचाच खरा हक्क आहे ही गोष्ट धनाजीस मनोमन पटत असल्याने खेडच्या लढाईत त्याने शाहूराजाच्या बाजूने डौल दिला व त्यात त्याचे नैतिकदृष्ट्या काही चुकले नाही असे त्याच्या बाजूने प्रतिपादन करता येईल. पण शाहूराजाच्या बाजूने डौल देण्यात केवळ ही एकच गोष्ट कारणीभूत झाली असावी, असे तत्कालीन ऐतिहासिक कागदपत्रे तपासत असता वाटत नाही. धनाजीचा हा निर्णय गतकालातील राजकारणाशी बांधला गेला होता. राज्यकर्त्या राणीशी-ताराबाईंशी-त्याचे संबंध ताणले गेले असावेत अशी खात्री होण्याइतका पुरावा हाती लागतो. ताराबाई-धनाजी यांच्यामधील दुरावा राजाराम महाराजांच्या हयातीतच उत्पन्न झाला होता. खेडच्या मैदानावरील धनाजीचे कृत्य या दुराव्याचे अंतिम फलित होते.

राजारामकालातील एक घटना आहे. सातारा जिल्ह्यातील पालीच्या खंडोबाच्या यात्रेच्या ऐवजाविषयी (डबीविषयी). गिरजोजी यादव आणि धनाजी जाधव या दोघांमध्ये खटला उत्पन्न झाला. गिरजोजी हा राजपरिवाराच्या खास विश्वासातील अधिकारी (अंत:पूरचा सरहवालदार) ताराबाईंनी या भांडणात हस्तक्षेप करून गिरजोजीच्या बाजूने निकाल दिला.[८] राज्याच्या सेनापतीला या निर्णयामुळे माघार घ्यावी लागली.

दुसरी घटना आहे खुद्द ताराबाईंच्या कारकिर्दीतील. राजाराम महाराजांनी गिरजोजी यादवास कऱ्हाड परगण्यात काही तर्फांची देशमुखी बहाल केली होती. गिरजोजीच्या काही भाऊबंदांनी या देशमुखीपैकी १० गावे धनाजी जाधवास विकली. परिणामी गिरजोजी-धनाजीमध्ये पुन्हा बखेडा उत्पन्न झाला. ताराबाईंनी त्या भाऊबंदांना ती १० गावे धनाजीकडून परत घेऊन गिरजोजीस देण्यास भाग पाडले![९] इथेही ताराबाईंचा निर्णय धनाजीच्या विरोधातच गेला. ही गावे परत करण्याच्या बाबतीत धनाजीने खळखळ केल्याची कागदोपत्री नोंद नाही. प्राप्त परिस्थितीशी मिळते घेऊन अनुकुल संधीची तो प्रतिक्षा करीत राहिला, असे दिसते. ही घटना खेडच्या लढाईपूर्वी बरोबर एक वर्ष घडून आली होती.

दोन्ही घटना वरवर साध्या दिसत असल्यातरी ताराबाई-धनाजी संबंधाच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. राज्यकर्त्या या नात्याने ताराबाईंचे निर्णय योग्य असतीलही. पण त्यामुळे सेनापतीच्या मनात दुरावा निर्माण झाल्याची शक्यता नाकारता येणार नाही. किंबहुना या घटना त्या दुराव्याचे प्रतीक तर नसाव्यात ना, अशी शंका येण्याइतपत जागा आहे.

राजाराम महाराज जात्याच सौम्य प्रकृतीचे होते. पण ताराबाई या स्वभावत:च हिकमती व हुकमती प्रवृत्तीच्या होत्या. राजारामकालात रामचंद्रपंत अमात्य, धनाजी जाधव इत्यादी मंडळींना बरेच कृतिस्वातंत्र्य होते. पंताने तर राजाराम महाराजांच्या जिंजीवासाच्या काळात महाराष्ट्रात स्वराज्याचा सर्वाधिकारी म्हणून काम पाहिले होते. धनाजीस मोहिमांचे सर्व प्रकारचे स्वातंत्र्य होते. अशा प्रकारे एकेकाळी हुकमत गाजविण्याची सवय झालेल्या या कर्तबगार मंडळींना नव्या राजवटीत एका महत्त्वाकांक्षी राणीच्या हुकमतीखाली राहणे थोडे क्लेशदायक व मानसिकदृष्ट्या त्रासाचे ठरत असावे. राजाराम महाराजांच्या मृत्यूनंतर अशा समान विचाराच्या मंडळींचा एक गट कळत न कळत ताराबाईंच्या विरोधात तयार झाला होता. राजारामकालात ही मंडळी छत्रपतींच्या खास विश्वासातील समजली गेली होती. पण नव्या राजवटीत त्यांची जागा आता परशुराम पंडित प्रतिनिधी, शंकराजी नारायण, सिधोजी व पिराजी घोरपडे, गिरजोजी यादव या मंडळींनी घेतली होती.

रामचंद्रपंत - धनाची जाधव यांच्या गोटात मोगली कैदेत असणाऱ्या शाहूराजाविषयी अधिक आस्था व सहानुभूती आहे, किंबहुना ते शाहूराजासच स्वराज्याचा खरा धनी मानतात, असा ताराबाईंना संशय होता. पुढे हा संशय बळावत गेला. राजाराम महाराजांच्या मृत्यूनंतर ताराबाईंनी आपल्या पुत्रास मुंज व राज्याभिषेक करण्याचा इरादा प्रकट केल्यावर त्यास पंताने-आताच मुंजीची गडबड का? शाहूराजे मोगली कैदेत आहेत. तेव्हा उभय राजकुमारांच्या मुंजी एकाच वेळी-शाहूराजे सुटून आल्यावर करू. शाहूराजांस राज्याभिषेक होईल व शिवाजीराजे युवराजपद सांभाळतील - असा अभिप्राय दिला. यावर ताराबाई संतापाने उद्‌गारल्या -शाहूराजे धनी, आणि शिवाजीराजे चोर

आहेत असा अर्थ नाही! शिवाजीराजाची मुंज अगत्यमेव मला कर्तव्य![१०] ही चिटणीस बखरीने दिलेली कथा अक्षरश: खरी असेल नसेल, पण त्यातून एक गोष्ट स्पष्ट होते की शाहूराजांची जोवर सुटका होत नाही तोवर ताराबाईंनी आपल्या पुत्रास राज्याभिषेक करू नये अशी पंताची व त्याच्या साथीदारांची इच्छा होती. अर्थातच ताराबाईसारख्या महत्त्वाकांक्षी स्त्रीस हे न रुचणारे होते.

या सर्व पार्श्वभूमीवर खेडच्या रणमैदानावरील धनाजीचा निर्णय तपासून पाहिला पाहिजे. धनाजीचा हा निर्णय अचानक झालेल्या मतपरिवर्तनातून उद्भवलेला नाही अथवा ताराबाई म्हणतात त्याप्रमाणे "विपरीत कालवशे मोहप्राप्तीतून " उत्पन्न झालेला नाही. धनाजीसारख्या सेनापतीने अत्यंत शांत डोक्याने विचारपूर्वक उचललेले हे पाऊल होते. यावेळी ताराबाईंनी धनाजीबरोबर रामचंद्रपंत अमात्याला खेडवर पाठविले असते तर तोही खचितच शाहूराजास मिळाला असता. हुकमती ताराबाईपेक्षा मवाळ व सौजन्यशील शाहूराजा राज्यकर्ता म्हणून केव्हाही त्यांना अधिक श्रेयस्कर वाटत होता.

दुसरे असे की रामचंद्रपंत व धनाजी यांनी ताराबाईशी एकनिष्ठ राहून खेडवर लढाई केली असती तर ताराबाईंकडून त्यांचे कौतुक झाले असते, फार तर मानसन्मान झाला असता, पण राज्यकर्त्या म्हणून त्या या सेवकांच्या उपकाराखाली राहिल्या नसत्या; कारण राज्याचे सेवक म्हणून त्यांनी आपले कर्तव्य बजावले असेच त्यांना वाटत राहिले असते. पण शाहूराजांच्या बाबतीत तसे नव्हते. खेडच्या लढाईवर त्यांचे राज्याचे धनीपण ठरणार होते. ही लढाई त्यांचे भवितव्य ठरविणारी होती. अशा परिस्थितीत पंत अथवा धनाजी यांनी त्यांना मिळणे हा त्यांच्यावर मोठा उपकार ठरणार होता. इथे भावी राज्यकर्ता-छत्रपतीच-या सेवकांचा कायमचा उपकृत राहणार होता. परिणामी शाहूराजाकडे जाण्यात या सेवकांना आपले उज्ज्वल भविष्य दिसत होते. त्यांच्या शब्दाला नव्या छत्रपतीच्या दरबारात अधिक मान व प्रतिष्ठा मिळणार होती. त्यांना तिथे अधिक कृतिस्वातंत्र्य मिळणार होते. असे कृतिस्वातंत्र्य घेण्याची संधी धनाजीस खेडच्या रणमैदानावर मिळाली. रामचंद्रपंतास ती मिळाली नाही एवढेच. पण पंताच्या मनात शाहूराजांविषयीचे आकर्षण मात्र कायम राहिले.

खेडच्या लढाईच्या प्रसंगी धनाजीच्या मनात कोणतेही विचार असोत, पण त्या विचारांनी मराठी राज्याच्या इतिहासाला कलाटणी मिळाली हे नाकबूल करता येणार नाही. मराठी राज्यातील आणीबाणीच्या प्रसंगी सेनापतीच्या "डौला" ने राजकीय परिस्थितीला कलाटणी मिळण्याचा हा दुसरा प्रसंग होता. यापूर्वी एकदा असेच सेनापतीच्या निर्णयास महत्त्व आले होते. शिवाजी महाराजांच्या निधनानंतर आण्णाजी दत्तो, मोरोपंत पिंगळे, बाळाजी आवजी व प्रल्हाद निराजी यांनी संभाजीराजांविरूद्ध घडवून आणलेल्या मसलतीस शह देऊन सेनापती हंबीरराव मोहित्याने राजांच्या बाजूने डौल दिला होता आणि इतिहासाचा प्रवाह बदलला होता. त्यानंतर २८ वर्षांनी राज्याच्या दुसऱ्या एका सेनापतीने इतिहासाची अशी पुनरावृत्ती केली होती!

## संदर्भ

१. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान) पृ. ३७.
२. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान) पृ. ४९
३. करवीर रियासत, पृ. ८५-८६.
४. मराठी रियासत -३ : पेशवा बाळाजी विश्वनाथ, पृ. ४४
५. ही गोष्ट खुद्द शाहूराजांनी पुढे खंडो बल्लाळचा पुत्र जिवाजी खंडेराव यास दिलेल्या इनामपत्रात नमूद केली आहे - सनदापत्रांतील माहिती, पृ. २१८-१९.
६. मराठी रियासत -३ : पेशवा बाळाजी विश्वनाथ, पृ. ४६.
७. करवीर रियासत, पृ. ९३; New History of The Marathas, Vol. II, p. 21.
८. ताराबाईकालीन कागदपत्रे, खं. १, पृ. १०६
९. ताराबाईकालीन कागदपत्रे, खं. १, पृ. २३९-२४०.
१०. थोरले राजाराम यांचे चरित्र (चिटणीस बखर), पृ. ७०.






# १३.

# पेशवे थोरले माधवराव यांचे शेती - संरक्षणविषयक धोरण

**प्रा. एस. ए. पाटील,**
कला आणि वाणिज्य महाविद्यालय, धुळे

---

प्रस्तुत शोध-निबंधात मराठ्यांच्या आर्थिक इतिहासाचे एक अंग म्हणून पेशवे थोरले माधवराव यांनी शेतकऱ्यांना दिलेले शेती संरक्षणविषयक धोरण मांडण्याचा प्रयत्न केला आहे. शिवाजी राजांपासून ते पेशव्यांपर्यंतच्या मराठी राज्यकर्त्यांनी शेतकऱ्यांना आर्थिक अडचणीच्या काळात तसेच दुष्काळात कर्ज पुरवठा, तगाई व शेतसाऱ्यात सूट देऊन आर्थिक मदत केल्याचे दिसून येते.

अठराव्या शतकात महाराष्ट्रात मुख्यत्वेकरून थोरले माधवराव पेशवे यांच्या अमदानीत विविध राजकीय घडामोडी घडत होत्या आणि स्वाभाविकच त्याचे पडसाद शेतकऱ्यांच्या जीवनावर आणि व्यवसायावर पडत होते. सतत होणारी युद्धे, अंतर्गत गृहकलह, पावसाची अनिश्चितता, आर्थिक मदतीचा अभाव इत्यादी कारणांमुळे मध्ययुगीन महाराष्ट्रातील शेती व्यवसाय आणि शेतकरी हे दोन्हीही मागासलेल्या अवस्थेत होते.

पेशवे बाळाजी बाजीराव यांच्या मृत्यूनंतर अवघ्या सोळाव्या वर्षीच माधवरावांना पेशवाईची वस्त्रे मिळाली. अत्यंत प्रतिकूल परिस्थिती असतानाही माधवराव पेशव्यांनी खंबीरपणे अकरा वर्षे राज्यकारभार सांभाळून कामगिरी पार पाडली. त्यापैकी एकूण फक्त आठ वर्षेच त्यांनी खराखुरा राज्यकारभार पाहिला. ह्या काळात त्यांना निजाम, हैदरअली या परक्या शत्रूंशी तसेच राघोबा, जानोजी भोसले यासारख्या अंतर्गत शत्रूंशी लढा द्यावा लागला. अल्पवयात व अल्पावधीत त्यांनी जो पराक्रम केला त्याला मराठ्यांच्या

इतिहासात तोड नाही. शिवाय शेतकऱ्यांना संरक्षण देऊन त्यांची स्थिती सुधारण्याचे जे प्रयत्न माधवराव पेशव्यांनी केले त्यासंबंधीचे अनेक पुरावे ऐतिहासिक कागदपत्रांतून वाचावयास मिळतात.

पेशव्यांच्या अमदानीत सरकारी वसुलाच्या बाबी पुष्कळ असल्या तरी त्या सर्वात जमीन-बाब ही मुख्य होती. जमिनीच्या प्रतीप्रमाणे तिची अव्वल, दुय्यम व सीम अशी प्रतबंदी केली जात असे. ही प्रतबंदी जिराईत जमिनीपुरती होती. त्याखेरीज बागाईत जमिनीची पाटस्थळ व मोटस्थळ अशी वर्गवारी पाडलेली होती व त्यानुसार वसूल ठरविला जाई. शेतजमिनीची पाहणी करणारे सरकारचे अधिकारी पाहणी करून सारा ठरवीत आणि सवाई व निमसवाई सूट दिली जाई. थोरले माधवराव पेशवे यांनी शेतकऱ्यांना अशा प्रकारची सूट दिल्याचे पेशवे रोजकीर्दीत वाचावयास मिळते. [१] माधवराव पेशव्यांच्या अमदानीत तांबेरा नावाचा रोग मराठी राज्यातील काही प्रदेशातील गव्हाच्या पिकावर सातत्याने दोन ते तीन वर्षे पडल्यामुळे शेतकऱ्यांना गहू पेरणीसाठी गव्हाची बिजवाई देखील मिळेनासी झाली. शेतकऱ्यांची अतिशय दुर्दशा झाली होती. पुढील वर्षासाठी गव्हाचे पीक पेरण्यास दाणा वैरण न मिळाल्यामुळे पेशवे सरकारलाही त्याची मोठी चिंता वाटत होती म्हणून पेशव्यांनी अशा शेतकऱ्यांना सारा सूट देऊन संरक्षण दिल्याचे ऐतिहासिक कागदपत्रांतून वाचावयास मिळते. [२]

धामधुमीमुळे व जाळपोळीमुळे नासधूस होऊन जुन्नर प्रांतातील शेतकरी हवालदिल झाला असता पेशव्यांनी तेथील अधिकाऱ्यास लावणीचा कौल देऊन शेतकऱ्यांना सवलती देण्याचा आदेश दिला होता. परंतु अधिकाऱ्याने आपले चौकशी कारकून चौकशीसाठी पाठविले नाहीत. शिवाय पेरणीचा हंगामही संपत आला होता. शेवटी पेशव्यांनीच रयतेला कौल देऊन काही सवलती दिल्या. त्याचा तपशील कागदपत्रातून खालीलप्रमाणे आढळतो तो असा - 'जी गावे जळाली त्यातील गुरांचे दाणा-वैरण जळाले, त्या गावाला सबंध वर्षाची सारामाफी देण्यात आली, जी गावे अर्धवट जळाली होती व अर्धवट लुटली गेली पण पूर्णपणे लुटली गेली नाहीत अशा गावांना एक वर्षापर्यंत १/३ सारामाफी देण्यात आली आणि ज्या गावांना खंडणी दिली होती ती गावे बचावल्यामुळे त्यांना एक वर्ष साऱ्याची निम्मी माफी दिली आणि ज्या गावांना कसल्याही प्रकारची इजा पोहचली नाही किंवा नासधूस झाली नाही त्यापासून भर आकार घ्यावा' अशा प्रकारचा कौल देण्यात आला होता. अशा प्रकारे शेतकऱ्यांना दिलासा देऊन राज्याची आबादानी करण्याचा प्रयत्न माधवराव पेशव्यांनी केला. [३]

इ.स. १७६२-६३ मध्ये राघोबा दादांच्या स्वारीमुळे शेतातील उभ्या पिकांची नासधूस व लुटमार झाली असता अहमदनगरच्या किल्ल्याच्या सानिध्यात असलेल्या मालोजी गाडेकर यांच्या शेताचा आकार माफ करण्याचे पत्र माधवराव पेशव्यानी कमाविसदार गणेश विठ्ठल यास दिले होते. [४]

इ.स. १७६३-६४ मध्ये जुन्नर प्रांतातील आळंदीच्या शेतकऱ्यांना दुष्काळाचा जबरदस्त तडाखा बसला तेव्हा शेतीच्या लागवडीच्या व आबादानीचा विचार करून पेशवे सरकारने शेतकीस उत्तेजन देण्यासाठी शेतकऱ्यांना दोन वर्षाचा शेतसारा माफ दिला होता.[५] जुन्नर प्रांतातच अवसेरी तालुक्यातील निरगुडसर गावास पुढील वर्षी इ.स. १७६५ मध्ये अवर्षणाचा तडाखा बसला असता माधवराव पेशव्यांनी तेथील शेतकऱ्यांची दयनीय अवस्था समजून घेऊन व दुष्काळी परिस्थितीचा विचार करून शेतसाऱ्यात सूट दिली.[६] पेशव्यांच्या अमदानीत मराठा-निजाम युद्धामुळे तसेच पेशवे व राघोबा दादा यांच्यातील गृहकलहामुळे शेतकऱ्यांचे दैनंदिन जीवन विस्कळीत होऊन शेतातील पिकांची नासाडी झाली असता माधवराव पेशव्यांनी शेतकऱ्यांना नुकसान भरपाई म्हणून शेतसाऱ्यात सूट दिली होती. इ.स. १७६७ ह्या वर्षी नेमाड प्रांतात खानदेश सुभ्यातील सरकार हांडियात दुष्काळ पडला असता नुकसान भरपाई म्हणून साऱ्यात सूट दिली. तसेच तगाई देखील सूट दिल्याचे ऐतिहासिक कागदपत्रांतून वाचावयास मिळते.[७]

अशा प्रकारे शेतीचा हंगाम प्रतिकूल आहे असे पेशवे सरकारला वाटले तर सरकार शेतकऱ्यास शेतसाऱ्यात सूट देई. शेतीच्या दृष्टीने प्रतिकूल काळ आल्यास महसूली उत्पन्न घटत असे व सातत्याने शेतकऱ्यास सूट द्यावी लागे. पाचाड या गावी हंगाम प्रतिकूल झाला असता पेशव्यांनी शेतकऱ्यांना बरीचसी सूट दिली होती. तसेच नाते या गावाच्या शेतकऱ्यांनाही अशीच सूट देण्यात आली होती. अशा प्रकारची सूट मिळाल्यामुळे स्थलांतरित झालेले शेतकरी निर्धास्त होऊन पुन्हा गावोगावी परत येऊन पुनर्वसन झाले होते.[८]

शेती लावणीच्या काळात शेतकऱ्याला जेवढी मदत व संरक्षण देता येईल तेवढे देण्याचा प्रयत्न माधवराव पेशवे करीत असत. विशेषत: दुष्काळाच्या तडाख्यात सापडलेला शेतकरी कोणत्याही प्रकारे तोशीस लागणार नाही असा आदेश पेशवे देत. पेशव्यांचे स्वारीचे मुक्कामाचे वेळी पिकांची नासधूस झाली असता दुष्काळाची परिस्थिती निर्माण होई. त्यावेळी पेशवे सरकारने तेथील शेतकऱ्यांना व गावकऱ्यांना नुकसान भरपाई म्हणून ताबडतोब आर्थिक मदत पाठवून देत आणि नुकसान-भरपाई देण्यासाठी कमाविसदारांना सूचना देत. अशा प्रकारची मदत गारपीर येथील शेतकऱ्यांना दिली असल्याची सनद माधवराव पेशव्यांनी बापूजी आनंदराव कमाविसदार यांचे नावे पाठविली होती.[९] आणि शेतकऱ्यांना संरक्षण देऊन शेती उत्पन्न वाढविण्याचे प्रयत्न केलेले दिसून येतात. माधवराव पेशव्यांनी शेतकऱ्यांना संरक्षण मिळावे व मदत व्हावी म्हणून दुष्काळात बी-बियाणे घेण्यासाठी कर्जरूपाने तसेच तगाई रूपानेही पैसा उपलब्ध करून दिला. पेशव्यांचे वसुली-अधिकारी हे देखील दुष्काळी परिस्थितीत दुष्काळ पिडीतांसाठी तगाई-मदत करावी अशा प्रकारची शिफारस पेशव्यांकडे करीत. माधवराव पेशव्यांच्या अमदानीत इ.स. १७६३-६४ ह्या वर्षी हांडिया सरकारमधील काही खेड्यांत दुष्काळ पडून गावे ओसाड बनली. रयतेवर उपासमारीची पाळी आली. तेव्हा शेतकऱ्यांच्या विनंतीवरून

वसुली अधिकाऱ्याने राघोबा दादांकडे दुष्काळ पीडितांसाठी पंचवीस हजार रुपये मंजूर करण्यासंबंधी शिफारस केल्याचे आढळते.

माधवराव पेशव्यांनी गावाची लावणी-संचणी तसेच पडीत जमिनी लागवडीखाली आणण्यासाठी शेतकऱ्यांना प्रोत्साहन दिले. धोडप तालुक्यातील आंबडापूर व हट्टी गावाच्या मुलुखाची नासाडी झाली असता तेथील मोकदमास गावावर येण्यासंबंधी व गावाची लावणी-संचणी करण्यासंबंधी कौल दिला.[११] माधवरावांनी राज्याचे उत्पन्न वाढावे म्हणून परागंदा झालेल्या शेतकऱ्यांना अभयपत्रे देऊन पुनर्वसन करण्यास उत्तेजन दिले. कऱ्हेपठार तालुक्यातील खलदच्या कुळांना गावावर येऊन वसाहत करण्याचे अभयपत्र दिले होते.[१२] पडीत जमिनी लागवडीखाली आणण्यासाठी नवीन शेतकऱ्यांचे देखील पुनर्वसन करण्याचे प्रयत्न मराठ्यांच्या अमदानीत केले जात. पुणे प्रांतात कऱ्हेपठार तर्फमधील हिवर गावी नवीन शेतकरी कुळांचे पुनर्वसन केल्याचे व सात वर्षांसाठी कौल दिल्याचे ऐतिहासिक कागदपत्रावरून दिसून येते. हा कौल इ.स. १७६६ ते १७७२ पर्यंत दिला होता.[१३] पेशव्यांच्या अमदानीत मराठी सरदारांनी देखील शेतकऱ्यांना पुनर्वसनाचे कौल दिले होते. दंग्याधोप्यामुळे मराठ्यांचे मुलूख नेहमीच उध्वस्त होत होते. अशा मुलुखाची आबादानी करण्यासाठी शेतकऱ्यांना संरक्षण दिले जात असे. चेऊल प्रांतात दंग्यामुळे नासाडी होऊन वसाहत मोडली होती. म्हणून पेशव्यांचे सरदार रघुजी आंग्रे यांनी इ.स. १७७० च्या सुमारास शेतकऱ्यांना कौल देऊन पुनर्वसन केले होते.[१४]

माधवराव पेशव्यांनी शेतकऱ्यांना कर्ज, तगाई वगैरे देऊन संरक्षण तर केलेच शिवाय दुष्काळग्रस्त भागातील शेतकऱ्यांच्या गुराढोरांसाठी चारा-वैरणाचे अन्नछत्र चालविणाऱ्यांना उत्तेजन दिले.[१५]

माधवराव पेशव्यांनी शेतकऱ्यांना संरक्षण मिळावे म्हणून दुष्काळासारख्या भयानक आपत्तीस तोंड देण्यासाठी कायमस्वरूपी उपाययोजना आखल्या होत्या. त्यानुसार त्यांनी धरणे बांधणे, कालवे खोदणे, पाटबंधारे बांधून त्यामार्फत शेतीला पाणीपुरवठा करणे, तलाव व तळी बांधणे व विहिरी खोदण्यास शेतकऱ्यांना उत्तेजन दिल्याची उदाहरणे ऐतिहासिक कागदपत्रांतून वाचावयास मिळतात. पेशव्यांनी धरणांच्या बांधकामास प्रोत्साहन मिळावे म्हणून धरणांच्या बांधकामासाठी काही रक्कम सरकारकडून खर्ची व्हावी यासाठी मंजुरी दिल्याचे व काही रक्कम शेतकऱ्यांकडून वसूल करण्याचे आपल्या अधिकाऱ्यांना कळविल्याची नोंद कागदपत्रातून आढळते. तर्फ खेरेबारेमधील मौजे नरसापूर येथील श्री बनेश्वरचे धरण बांधण्यासाठी आठशे रुपये खर्च येणार होता. त्यापैकी चारशे रुपये रोख सरकारी वसुलीतून देण्यात आले होते आणि बाकीचे चारशे रुपये ज्या शेतकऱ्यांस धरणाचे पाणी बागाईत जमिनीसाठी मिळेल त्यांच्याकडून घेण्यात यावे असा आदेश देण्यात आला होता.[१६]

तसेच पेशव्यांचे अमदानीत बंधाऱ्यांची दुरुस्ती करून जमीन लागवडीखाली

आणण्यासाठी शेतकऱ्यांना प्रोत्साहन मिळत असल्याचे काही पुरावे कागदपत्रातून आढळतात. बागलाण प्रांतातील एका पाटस्थळाचा बंधारा वाहून गेला असता तो फिरून बांधण्यासाठी दहा हजार रुपये खर्च येणार होता. तो बांधण्याचे राघो नारायण कुळकर्णी यांनी कबूल केले होते. बागलाण प्रांतात बंधारे बांधून पाटस्थळ करून जो नवी जमीन बागाईत करील त्यास दर शेकडा दहा बिघे जमीन इनाम द्यावयाचा शिरस्ता होता. सदरप्रमाणे इनाम खाऊन शेतकरी पाटबंधाऱ्याची दुरुस्ती ठेवीत. [१७] अतिवृष्टी झाल्यामुळे पाण्याचा बंधारा फुटत असे व त्यामुळे बागाईत पिकांची नासाडी होऊन शेतकऱ्याचे आर्थिक नुकसान होई. अशा वेळी पेशवे सरकार बंधाऱ्यांच्या दुरुस्तीची काळजी घेत असे. त्यासाठी ताबडतोब खर्च मंजूर करून दुरुस्तीचे आदेश दिले जात होते. तुंगभद्रेच्या एका कालव्याचा बंधारा फुटून नुकसान होऊ लागल्यामुळे कोपल परगण्याच्या वसुलातून बांध दुरुस्तीसाठी दोन हजार होन एवढी रक्कम खर्च करण्यासंबंधीचा आदेश होऊन जमाबंदीत ती रक्कम खर्ची घालण्यात आली होती. [१८]

शेतकऱ्यांना शेतीसाठी धरणाच्या पाण्याचा उपयोग होत असे. कधी कधी धरणाच्या पाण्याच्या बंदीवरून शेतकऱ्यांत वाद होत असल्याचे दाखलेही कागदपत्रांतून वाचावयास मिळतात. खानदेश प्रांताच्या सोनगीर परगण्यातील जापी व निंबखेड या गावांतील शेतीला पांझरा नदीवरील पाटबंधाऱ्यातून पाटाने होणाऱ्या पाणीपुरवठ्याचा उल्लेख पेशव्यांच्या रोजकीर्दीत मिळतो. सदरहू पाटाच्या पाण्याचा वापर दोन्ही गावांच्या शेतकऱ्यांनी कशा प्रकारे वाटून घ्यावा आणि पाटाची दुरुस्ती व बंधारा फुटल्यास त्याचा खर्च दोन्ही गावाच्या शेतकऱ्यांनी कशा प्रकारे करावा यासंबंधीचा उल्लेखही कागदपत्रांतून वाचावयास मिळतो. [१९] यावरून माधवराव पेशव्यांच्या काळात कालव्यांच्या निर्मितीसाठी रयतेस उत्तेजन देऊन आपसातील झगडेही मिटविण्याचे प्रयत्न केले जात होते असे दिसते.

उपरोक्त विवेचनावरून असा निष्कर्ष काढता येतो की छत्रपती शिवाजी राजांनी शेतकऱ्यांची स्थिती सुधारण्यासाठी व दुष्काळासारख्या आपत्तीला तोंड देण्यासाठी आणि शेतकऱ्यांना संरक्षण देण्यासाठी जे विविध मार्ग व ध्येयधोरण अवलंबिले त्याच ध्येयधोरणाचा व उपाययोजनांचा शिवोत्तर काळात त्यांच्या वारसदारांनी आणि माधवरावासारख्या पेशव्यांनीही अवलंब केल्याचे दिसून येते. मराठ्यांनी समाजकल्याण कार्याच्या बाबतीत निष्क्रीयता दाखविली होती अशा प्रकारची पाश्चिमात्य लेखकांनी [२०] केलेली टीका वरील विवेचनाच्या आधारे निरर्थक असल्याचे म्हणता येईल.

## संदर्भ

१. **पेशवा डायरी**, खंड ७, ले. ४१६
२. **अप्रकाशित कागदपत्रे, यातून संशोधनासाठी निवडलेली कागदपत्रे** द. क्र. १०, पु. क्र. १, पत्र क्र. ५३६८, पुणे पुराभिलेख.
३. **पेशवा डायरी**, खंड ७, ले. ४३०

४. तत्रैव, खंड ७, ले. ४२०

५. तत्रैव, ले. ४२९

६. **पेशवे दफ्तर** भाग ३९, ले. ५९

७. राजवाडे, वि. का., **मराठ्यांच्या इतिहासाची साधने**, खंड १३ व १४, ले. १२८

८. आवळसकर, शां. वि., **रायगडची जीवनगाथा**, पृ. १२१-२२

९. **अप्रकाशित कागदपत्रे, पेशवे रोजकीर्द**, रू. नं. ८२, पुणे पुराभिलेख.

१०. **पेशवे दफ्तर**, भाग ३९, ले. १६७

११. **पेशवा डायरी** खंड ७, ले. ४३१

१२. **पुरंदरे दफ्तर** भाग ३, ले. ४८

१३. तत्रैव, ले. १३८

१४. राजवाडे, वि. का., **म. इ. साधने,** खंड ३, ले. ५६८

१५. **पेशवा डायरी**, खंड ७, ले. ७०३

१६. तत्रैव, ले. ४२७

१७. तत्रैव, ले. ४२६

१८. तत्रैव, ले. ४२८

१९. तत्रैव, ले. ५३८

२०. स्मिथ, व्ही. एस्., **अकबर दि ग्रेट मुघल** (१९६६), २८९-९०



१४.

# सोंडूरकर घोरपडे यांची काही अप्रकाशित कागदपत्रे व दसनामी गोसावी संप्रदाय

डॉ. माधव रा. कंटक
डेक्कन कॉलेज, पुणे

---

प्रस्तुत लेख कर्नाटकातल्या सोंडूरच्या घोरपडे घराण्याशी संबंधित असलेल्या काही मोडी कागदपत्रांवर आधारलेला आहे. या कागदपत्राच्या जोडीला दसनामी गोसाव्यांसंबंधी सर जदुनाथ सरकार यांनी केलेल्या ऐतिहासिक, डॉ. घुर्ये यांनी केलेल्या समाजशास्त्रीय व दसनामी संप्रदायी पृथ्वीगीर गोस्वामी यांनी केलेल्या संकलनपर लिखाणांचा पूरक म्हणून वापर केलेला आहे. सरकार व पृथ्वीगीर यांचे लिखाण अनुक्रमे 'A History of Dasnami Naga Sanyasis' आणि 'गोसावी व त्यांचा संप्रदाय' (खंड १,२) या इंग्रजी व मराठी ग्रंथांच्या रूपाने इ. १९२६ मध्ये व इ. १९५० च्या सुमारास प्रसिद्ध झाले. डॉ. घुर्ये यांचे 'Dasnamis or Shankar School of Sadhus' व 'Dasnami Nagas or Militant Sanyasis' हे दोन लेख त्यांच्या 'Indian Sadhus' या ग्रंथाच्या पहिल्या व दुसऱ्या आवृत्त्यांमध्ये (इ. १९५३ व इ. १९६४) प्रकाशित झाले. या ठिकाणी प्रथम हे स्पष्ट केले पाहिजे की प्रस्तुत निबंधामध्ये दसनामी गोसाव्यांसंबंधी नवीन संशोधन आलेले नाही. सरकार, घुर्ये, पृथ्वीगीर गोस्वामी व काही इंग्रज लेखक यांनी या गोसाव्यांची उत्पत्ति, इतिहास समाजशास्त्रीय माहिती व कामगिरी यांच्या संदर्भात ते आधीच केलेले आहे. सोंडूरकर घोरपड्यांच्या कागदपत्रांच्या व उल्लेखित तीन ग्रंथांच्या आधारे दसनामी संप्रदायाच्या जुन्या इतिहासाच्या व त्याच्या कामगिरीच्या मूल्यमापनाच्या संदर्भात मी

येथे दोन निष्कर्ष मांडले आहेत. त्यांपैकी पहिला सिद्धांताच्या स्वरूपात तर दुसरा प्रमेयाच्या स्वरूपात आहे.

या लेखात वापरलेली कागदपत्रे सोंडूरकर घोरपडे घराण्याच्या खाजगी दप्तरातील असून त्यांची संख्या चौदा आहे. दोन वर्षांपूर्वी त्या घराण्याचे एक विद्यमान वंशज श्री. यशवंतराव घोरपडे यांनी पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळाचे तेव्हाचे एक कार्यवाह डॉ. गो. त्र्यं. कुलकर्णी यांच्याकडे ती पत्रे बालबोध लिप्यंतरासाठी पाठविली होती. डॉ. कुलकर्णी यांनी लिप्यंतराचे काम माझ्याकडे दिले, याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. या चौदा कागदपत्रांपैकी तेरा इ. १७८० ते १८०८ या दरम्यानची, म्हणजे नाना फडणीस व दुसरा बाजीराव यांच्या राजवटीतली आहेत. राहिलेला एक कागद अव्वल इंग्रजीतला म्हणजे इ. १८६५ चा आहे. या सर्व पत्रांचा विषय एकच आहे. तो म्हणजे सोंडूरकर घोरपडे व दसनामी गोसावी यांतील आर्थिक संबंध. हे संबंध कशा प्रकारचे होते हे स्पष्ट करण्यासाठी दोनतीन लहान पत्रांतील मूळ मजकूर खाली दिलेला आहे-

१) ''राजश्री जयेसीगिरी बावा महंत गोसावी यासी अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्वे॥ वेंकटराव घोरपडे दंडवत विनंती उपरी. आपण या दौलतीचे खैरखवा. आपले चालवावे हे विहित जाणून हाली त्या परगणियास व पुढे गुती व पिलगुंडे आदिकरून मुलूक सुटेल ते देखील जमाबंदी हकदार इनामदारसिवाय बेरिजेस दर एक रु / स दमडीप्रमाणे आपणास रुसुम करार करून दिल्हे असे. समग्र सरकार तालुकेस दर रु / स दमडीप्रमाणे घेत जाणे.'' (९सप्टें. १७८१ चे पत्र)

२) ''राजश्री उमेदगिरीबावा गोसावी यासी अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्वे॥ वेंकटराव घोरपडे ममलकतमदार सेनापती नमो नारायेण सु॥ अर्बा मयातैन अलफ तुम्ही सोंडूर मुकामी हुजूर येऊन आम्ही पेशजी जैसिंगगिरीबावा महंत याजकडून कर्ज घेऊन कतबा व यादी वगैरे लिहून दिल्हे होते ते झाडून आमचे आम्हास आणून देऊन तुमचे ऋणापासोन मुक्त केल्या व साहेबी तुम्हास प॥ सोंडूर येथील खासगत कमतापैकी जमीन नेमून स्वाधीन करून करार केले बि॥ (इ. १८०४ फेब्रुवारी २२ चे पत्र).

३) ''तपोनिधी ज्यसिंगगीर महंत गोसावी यासी श्वो॥ माधवराव नारायण प्रधान सु॥ इहिदे समानीन मया व अलफ तुम्हाकडे कर्जाचा यैवज करार केला आहे ते बादल देणे मुरारराव हिंदुराव घोरपडे याचे पथकास सन तिसा सबैनचे नालबंदीपैकी नख्त हुकेरी रु॥

२००० आषाढ अखेरीस यावे ते
२००० भाद्रपद शु॥ पौर्णिमेस
४००० ,, (१७८०-८१ च्या सुमारचे पत्र)

या तीन पत्रांपैकी दुसऱ्या व तिसऱ्या पत्रांवरून दिसून येईल की जयसिंगगिरी बावा व उमेदगिरीबावा गोसावी यांनी व्यंकटराव घोरपड्यांना त्यांच्या अडचणींच्या प्रसंगी

कर्जे दिलेली असून त्याबद्दल घोरपड्यांकडून त्यांना इनाम म्हणून जमिनी मिळालेल्या आहेत. पहिल्या पत्रात जयसिंगगिरीबावास रुपयामागे एक दमडीप्रमाणे वसूल घेण्याचा हक्क निरनिराळ्या परगण्यात मिळालेला आहे. अशाच प्रकारचा मजकूर असलेली इतर राहिलेली दहाअकरा पत्रे आहेत. या सर्व चौदा पत्रांवरून कळून येते की, उमेदगिरी, जयसिंगगिरी हे गोसावी घोरपड्यांच्या सावकारांपैकी एक असून त्यांनी घोरपड्यांना वेळोवेळी कर्जे दिलेली होती. वरील पहिल्या पत्रात 'तुम्ही दौलतीचे खैरखवा (हितचिंतक) आहात, असे जे वाक्य आलेले आहे ते या अर्थानेच. तसेच सवाई माधवरावाच्या पत्रात जयसिंगगिरीला 'तपोनिधी' म्हटले आहे. म्हणजे धार्मिक बाबतीतही त्याला आदरणीय म्हणून मान दिलेला आहे. दसनामी गोसावी हे सोंडूरकर घोरपड्यांच्या आर्थिक आधारस्तंभांपैकी एक होते.

केवळ सोंडूरकर घोरपडे व दसनामी गोसावी यांच्यातील आर्थिक संबंधापुरता विचार केला तर घोरपड्यांच्या कागदपत्रांचे महत्त्व येथेच संपते व त्यास अनुसरून प्रस्तुत लेखही येथेच संपवावा लागेल. पण तसे नाही. ही कागदपत्रे घोरपडे -गोसावी संबंधापलीकडे जाऊन अप्रत्यक्षपणे आणखी काही तरी सूचित करतात. या संबंधाचा धागा पकडून आपण आणखी पुढे जाऊन विचार केला तर असे आढळून येईल की दसनामी गोसावी हे केवळ घोरपड्यांच्या दौलतीचेच नव्हे तर १८ व्या शतकातल्या उत्तर भारतातील बहुतेक सर्व मोठ्या राज्यकर्त्यांचे खैरख्वाहा म्हणजे हितचिंतक होते. घोरपड्यांच्या संबंधातील त्यांची कामगिरी १८व्या शतकातील त्यांच्या एकूण बहुविध कामगिरीचा केवळ एक छोटासा भाग होती.

जदुनाथ सरकार, डॉ. घुर्ये, पृथ्वीगीर गोस्वामी व इंग्रज लेखक यांनी दसनामी गोसाव्यांच्या केलेल्या अभ्यासावरून दसनामी संप्रदायाची चार खास अशी वैशिष्ट्ये सहजपणे दिसून येतात की जी भारतातील इतर धार्मिक संप्रदायांत व पंथांत आढळून येत नाहीत. पहिले वैशिष्ट्य म्हणजे कालदृष्ट्या हा संप्रदाय बहुदा सर्वात जुना असावा. दुसरे वैशिष्ट्य म्हणजे, राजकीय, राजनैतिक, आर्थिक, लष्करी, धार्मिक व सांस्कृतिक अशी विविध प्रकारांची अष्टपैलू कामगिरी बजावणारा, म्हणजेच ब्राम्हण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांची कर्मे शूद्रांच्या सेवावृत्तीने पार पाडणारा हाच एकमेव संप्रदाय होय. या संप्रदायाचे तिसरे वैशिष्ट्य म्हणजे, त्याने १८ व्या व १९ व्या शतकांत मराठे, राजपूत, जाट, बुंदेले, मुघल व इंग्रज या सर्वांशी मैत्रीही केली व त्यांचे शत्रुत्वही पत्करले. सर्वात गंमत म्हणजे एकमेकांविरूद्ध असलेल्या या सर्व राज्यकर्त्यांचा त्यांनी असा विश्वास संपादन केला होता की तसा दुसरे कोणी संपादू शकले नाहीत.

दसनामी गोसाव्यांच्या भारताच्या इतिहासातील अष्टपैलू कामगिरीचे सविस्तर वर्णन या छोट्याशा लेखात देता येणार नाही. येथे फक्त काही निवडक महत्त्वाच्या गोष्टींचाच निर्देश करता येईल. दसनामी गोसाव्यांनी फक्त सोंडूरच्या घोरपड्यानाच नव्हे तर इतर अनेक राज्यकर्त्यांना आर्थिक मदत केली. हैद्राबादच्या निजामाला गोसाव्यांचे

एक कोटी रुपयांचे कर्ज होते व त्यासाठी त्याने वऱ्हाड प्रांत पाच वर्षे त्यांच्याकडे गहाण ठेवला होता. आर्थिक मदतीबद्दल गोसाव्यांना त्याच्या दरबारी खूप मान होता. नागपूरच्या जानोजी भोसल्याला अडचणीच्या वेळी उदेपुरी गोसाव्याने एक लाख रुपयांची मदत केली, तर मुधोजी भोसल्याला गोसाव्यांचे पन्नास लाख रुपयांचे कर्ज होते. पहिल्या बाजीरावाच्या मृत्यूनंतर त्याच्या नावावर जे एकूण कर्ज होते त्यात गोसाव्यांचे एक लाख एकोणसत्तर हजार देणे होते. पेशव्यांच्या सावकारांत गोसाव्यांचीही नावे आढळून येतात. गंमत म्हणजे छत्रपती राजारामाच्या काळात मावळचा सुभेदार पंताजी शिवदेव सोमण याने गोसाव्यांकडून काही लाखांचे कर्ज घेतले होते व त्यांपैकी दहा लाख इ. १७२७ पर्यंत फेडले गेले नव्हते. राजकीय दृष्टीने विचार केला तर राजेंद्र गीर गोसावी, अनुपगीर गोसावी व उमरावगीर गोसावी यांनी १८ व्या शतकात दिल्लीच्या व उत्तर भारताच्या राजकारणात बजावलेली प्रभावी कामगिरी प्रसिद्ध आहे. महादजी शिंद्याला उत्तरेच्या राजकारणात महत्त्व प्राप्त करून देण्यात महत्त्वाचा वाटा उचलणारा व त्याच्याशी जमेनासे होताच त्याला प्रखर विरोध करून त्याच्यावर लालसोटचा प्रसंग आणणारा अनुपगीर गोसावी हा होता. लष्करीदृष्ट्या विचार केला तर असे दिसते की उत्तरेतील मुघल, मराठे, राजपूत, जाट, बुंदेले सरदारांच्या सैन्यात गोसाव्यांच्या पलटणी होत्या. महादजी शिंद्याने गोसावी पलटणींचा भरपूर उपयोग करून घेतला. गोसावी सैनिक म्हणजे अत्यंत निष्ठेने लढणारे व लढताना स्वतःचे प्राण कस्पटासमान मानणारे, असा त्यांचा लौकिक होता. अनेक लढायांतून त्यांनी हे सिद्ध करून दाखविले. त्यांचे इतर सहकारी जरी रणांगणातून पाठ दाखवून पळाले तरी गोसावी सैनिक मागे हटत नसत. औरंगजेब व अहमदशाह अब्दाली यांच्या सैन्यानी मथुरा, वृंदावन या ठिकाणांवर हल्ले केले तेव्हा दसनामी नंग्या गोसाव्यानी केलेले बलिदान प्रसिद्ध आहे. पानिपतच्या लढाईत अयोध्येच्या शुजाउद्दौल्याच्या बाजूने मराठ्यांविरुद्ध लढणाऱ्यांत गोसावी सैनिकांची पलटण होती व या लढाई नंतर विश्वासराव, भाऊसाहेब वगैरेंच्या शवाना स्वतःचा जीव धोक्यात घालून मंत्राग्नि दिला तो उमरावगीर व त्याच्या साथीदार गोसाव्यानीच. राजनैतिक (Diplomacy) बाबतीतही गोसाव्यांची कामगिरी तितकीच महत्त्वाची आहे. १८ व्या शतकामध्ये मराठे ज्या वेळी राजपूत राजांकडून चौथाईची थकलेली बाकी वसूल करण्यास जात त्या वेळी हे गोसावीच बऱ्याच वेळा राजपुतांतर्फे मध्यस्थ व हमीदार असत. राजपूत व मराठे या दोघांचाही गोसाव्यांवर विश्वास असे. राजपूत व मराठे यांच्याप्रमाणेच मुघल, जाट, बुंदेले इतकेच नव्हे इंग्रजानीही दसनाम्यांचा दूत म्हणून उपयोग करून घेतलेला आहे. ग. ज. वॉरन हेस्टिंग्जने भूतानच्या राजाच्या हल्ल्यांपासून कुचबिहारचे रक्षण करण्यासाठी तसेच बंगाल व तिबेट यांच्यामधील व्यापार वाढावा म्हणून, अनुक्रमे इ. १७७५ व इ. १७८४ मध्ये, जॉर्ज बोगल व सॅम्युएल टर्नर यांना आपले वकील म्हणून ल्हासा येथे तिबेटच्या तिसू लामाकडे पाठविले. त्या वेळी त्याने पुरणगिरी या गोसाव्याला आपला खास मदतनीस म्हणून ल्हासाला पाठविले होते, ही विचार करण्यासारखी गोष्ट

आहे. टर्नरने पुरणगिरीच्या मदतीचा कृतज्ञतेने आपल्या अहवालात उल्लेख केला आहे. धार्मिक क्षेत्रातही गोसावी लोक पुढे होते. मेवाडचे राजपूत राजे गोसाव्यांच्या शुद्ध धार्मिक आचरणामुळे त्यांना धार्मिक गुरू मानत व एकलिंगजीची पूजा करण्याचा मान गोसाव्यांनाच होता व आजही आहे. १८ व्या शतकातील हिंदू राजे तर दसनामी गोसाव्यांचा धार्मिक क्षेत्रात आदर करीत होतेच. पण १७ व्या शतकात शिवाजी महाराजानीही निश्चलपुरी गोसावी याच्या सांगण्यास मान देऊन स्वत:स दुसरा राज्याभिषेक तांत्रिक पद्धतीने करवून घेतला होता. त्यावरून निश्चलपुरीचा व त्याच्या संप्रदायाचा १७ व्या शतकातील मराठी समाजावर असलेला प्रभाव कळून येतो. दसनामी गोसाव्यांनी बांधलेली कित्येक देवळे, मठ, घाट, धर्मशाळा भारतभर अनेक ठिकाणी आढळून येतात. त्यातील काही बांधकामे कलात्मकतेच्या दृष्टीनेही वाखाणण्यासारखी आहेत. पुण्यातल्या गोसावीपुऱ्यातील व हैद्राबादमधील बांधकामे त्या दृष्टीने उल्लेखनीय आहेत. अशा रीतीने दसनामी गोसाव्यांनी राजकीय, राजनैतिक, लष्करी, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतिक अशा विविध क्षेत्रांत भरीव कामगिरी बजावलेली दिसते. इतकी मोठी कामगिरी करणारे गोसावी दक्षिणेतील सोंडूरच्या छोट्याशा राज्यात 'खैरख्वाहा' व 'तपोनिधी' इत्यादी विशेषणांनी गौरविले गेले, तर त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीही नाही.

यावर असा प्रश्न उपस्थित होतो की अशा प्रकारची कोणीही न केलेली अष्टपैलू कामगिरी करणारा दसनामी गोसावी संप्रदाय इतर काही संप्रदायांशी व पंथांशी तुलना करता उपेक्षित का राहिला ? याचे महत्त्वाचे कारण असे दिसते की गोसाव्यांच्या अंगी विविध गुणे असले तरी त्या गुणांना योग्य दिशा व वळण देणारे ध्येय व तत्त्व त्यांच्या डोळ्यासमोर नव्हते. उच्च ध्येयाभावी चांगले गुणही कित्येकदा सामान्य ठरतात. गोसाव्यांच्या बाबतीत तसेच झाले. ते धार्मिक म्हणजे विधी-नियम कडकपणे पाळणारे कर्मठ होते. पण धार्मिक कर्मठपणा म्हणजे आध्यात्मिकता नव्हे. गोसावी हे जरी स्वत:ला संन्यासी म्हणवत असले तरी खऱ्या संन्याशाला आवश्यक असलेले वैराग्य व ईश्वरदर्शनाची तळमळ यांच्या अभावामुळे हा संप्रदाय भारतीय समाजापुढे कोणतेही उच्च आध्यात्मिक ध्येय ठेवू शकला नाही. त्यामुळे वारकरी पंथ, नाथपंथ, रामदासी पंथ, कबीरपंथ इत्यादीप्रमाणे त्याला आध्यात्मिक क्षेत्रात महत्त्व प्राप्त होऊ शकले नाही. बरे, ऐहिक बाबतीत तरी एखादे मोठे ध्येय त्यांनी नजरेसमोर ठेवले म्हणावे तर तसेही दिसत नाही. वस्तूत: ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य या त्रैवर्णिकांचे गुण अंगी असलेल्या गोसाव्यांनी स्वत:चे असे एक प्रजाहित साधक स्वतंत्र राज्य स्थापण्यास हरकत नव्हती. पण तसे काही ध्येय त्यांच्यासमोर नसल्याने मराठे, राजपूत, शीख वगैरेनी राजकीय क्षेत्रात जी कामगिरी करून दाखविली तेवढीही दसनामी गोसावी करू शकले नाहीत. भारतातील निरनिराळ्या राज्यकर्त्यांची सेवा करून जे आर्थिक लाभ व इतर सन्मान पदरात पडले त्यांतच त्यांनी सार्थकता मानली. या सेवेतही काही विशिष्ट प्रकारची निष्ठा होती असे दिसत नाही. ज्या मुघल सैन्याविरुद्ध मथुरा, वृंदावन यांचे रक्षण करण्यासाठी प्राणपणाने त्यांनी लढा

दिला त्याच मुघलांना व त्यांच्या बादशाहीला त्यांनी मदत केली! याउलट शिखांकडे पहा. त्यांनी धर्मरक्षणासाठी एकदा मुघलांविरुद्ध जी तलवार उपसली ती शेवटपर्यंत म्यान केली नाही. मराठे, राजपूत, जाट, बुंदेले यांना गोसाव्यांनी मदतही केली व त्यांच्याविरुद्ध ते उभेही ठाकले. त्यांच्या वागण्यातील या परस्परविरोधामुळेच त्यांच्या कामगिरीच्या मानाने त्यांना जेवढे महत्त्व मिळायला हवे होते तेवढे मिळाले नाही. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे सर्व गोसावी मठांची संघटना बांधणारा व त्यांच्यासमोर विशिष्ट ध्येय ठेवून त्यांना कार्यप्रवण करणारा कल्पक नेता गोसाव्यांना मिळाला नाही. दसनामी गोसाव्यांसंबंधी दुसरा एक महत्त्वाचा मुद्दा आहे. आज अशी एक समजूत प्रचलित आहे की शंकराचार्यांपूर्वी वेदकाळापासून भारतात अरण्यात राहणारे सर्वसंग परित्यागी संन्यासी व नगरांत राहणारे गृहस्थाश्रमी संन्यासी असे दोन प्रकारचे संन्यासी अस्तित्वात होते. गिरी (पर्वत), पुरी (नगर), भारती (ज्ञान), वन, अरण्य, पर्वत, सागर, सरस्वती, तीर्थ आश्रम अशा त्यांच्या दहा शाखा होत्या. त्या अनेक ठिकाणी विखुरलेल्या असून त्यांचे कार्य वैयक्तिक पातळीवर चालू होते. पुढे शंकराचार्यांनी शृंगेरी, पुरी, बद्रीकेदार व द्वारका या ठिकाणी चार मठ स्थापून प्रत्येक मठाच्या आधिपत्याखाली त्याच्या त्याच्या भागातील संन्याशांच्या विशिष्ट शाखा आणून या सर्वांची एक संघटना उभी केली. दहा शाखांवरून या संघटनेला दसनाम गोसावी असे म्हणण्यात येऊ लागले. काहीजण हे काम शंकराचार्यांनी केले नसून त्यांच्या नंतरच्या काळात झालेल्या सुरेश्वराचार्यांचे समजतात. याप्रमाणे शंकराचार्य किंवा सुरेश्वराचार्य यांचा संबंध दसनामी संप्रदायाशी जोडला जातो, तो बरोबर वाटत नाही. असे म्हणण्याची दोन कारणे आहेत. पहिले कारण म्हणजे शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान हे अद्वैताचे व संन्यास मार्गाचे होते. राजकारण, सावकारी, युद्धे, कानफाटे जोगी व वैरागी यांच्याशी मारामाऱ्या करून रक्तपात करणे इत्यादी दसनामी गोसाव्याचे प्रकार त्यांच्या तत्त्वज्ञानात बसणारे नाहीत. बरे, गोसाव्यांनी राजकारण, युद्धे यांचा अवलंब केवळ धर्मरक्षणासाठी केला होता असेही दिसत नाही. दुसरी गोष्ट म्हणजे, दहा नावे धारण करणारे गोसावी जर शंकराचार्यांनी वा त्यांच्या परंपरेतील इतर कोणी आचार्यांनी संघटित केले असतील तर भारतातील सर्व दसनामी मठ शंकराचार्यांच्या चार मठांच्या आधिपत्याखाली हवे होते. तसेच त्या सर्व मठांचा कारभार शंकराचार्यांच्या चार मठांच्या नियमांप्रमाणे चालावयास हवा होता. पण प्रत्यक्षात तसे दिसत नाही. मग काय शंकराचार्यांचा गोसावी संप्रदायाशी काही संबंधच नव्हता? तसेच काही म्हणता येणार नाही. दसनामी गोसाव्यांत गेली अनेक शतके जी समजूत प्रचलित आहे तिच्यात काही तथ्यांश निश्चित असणार. मात्र शंकराचार्यांच्या दसनामी संप्रदायाशी असलेला संबंध वेगळ्या स्वरूपाचा असावा असे वाटते. या संदर्भात एक प्रमेय (Hypothesis) मांडण्यासारखे आहे.

गोसावी लोक वेद-महाभारत काळात होते की नाही हे सांगणे अवघड आहे. पण सिकंदरने इ. पूर्व तिसऱ्या शतकात हिंदुस्थानवर स्वारी केली त्या वेळी ते होते

असे निश्चितपणे म्हणता येते. कारण अलेक्झांडरच्या स्वारीचा इतिहास लिहिणारा डायोडोरस याने गोसाव्यांनी सिकंदरला चिनाबरावी दरम्यान केलेल्या अयशस्वी प्रतिकाराचे वर्णन त्यांना 'ग्लोसाई' या शब्दाने संबोधून केले आहे. त्याने केलेल्या ग्लोसायांचे वर्णन गोसाव्यांच्या वर्णनाशी जुळणारे आहे. तसेच एरियन याने, रानावनात नग्न हिंडणाऱ्या हिंदु संन्याशाना नग्न तत्त्वज्ञानी असे म्हटले आहे. याबद्दल वाद होऊ शकेल. पण पुढल्या काळातील मेगॅस्थेनीस व स्ट्राबो या ग्रीक इतिहासकारानी, त्यांच्या वृत्तांतात, अरण्यात नग्नावस्थेत राहणाऱ्या व नगरात राहून गृहस्थधर्माची कर्तव्ये करणाऱ्या अशा दोन प्रकारच्या संन्याशांचा स्पष्टपणे उल्लेख केला आहे. ८ व्या व ९ व्या शतकांत हिंदुस्थानात आलेल्या अबू झैद व इफूम सुरी या अरबी प्रवाशांनीही अशाच दोन प्रकारच्या संन्याशांचे वर्णन त्यांच्या प्रवासवृत्तांतात केले आहे. दसनामी पंथात त्यांना अनुक्रमे संन्याशी व घरबारी संबोधिले जाते. शंकराचार्यांच्या पूर्वीच्या काळात या दोन्ही प्रकारच्या संन्याशांचे कार्य व्यक्तिगत स्वरूपात चालू होते. पुढे ९व्या शतकाच्या मध्यास शंकराचार्यांचे सर्वसंगपरित्यागी संन्याश्यांच्या संघटनेचे कार्य सुरू झाले. तेव्हा अद्वैत वेदांत तत्त्वज्ञान, संन्यासधर्म व मठांद्वारे संघटना यांना भारतभर प्रचंड महत्त्व प्राप्त झाले. शंकराचार्यांच्या या कार्यापासून प्रेरणा घेऊन कोणातरी गृहस्थी संन्याशाने किंवा संन्याशांनी निरनिराळ्या ठिकाणी विखुरलेल्या सर्वसंगपरित्यागी व गृहस्थी संन्याशाना एकत्र आणून, त्यांचे मठ स्थापून त्यांची संघटना उभारली असावी. ही गोष्ट शंकराचार्यांच्या निधनानंतर थोड्याच काळात घडून आली असावी. ज्यांनी कोणी ही संघटना उभारली त्यांनी आपल्या पंथाला तात्त्विक बैठक व प्रतिष्ठा प्राप्त व्हावी म्हणून शंकराचार्यांचे अद्वैत तत्त्वज्ञान व त्यांची मठपद्धती यांचा स्वीकार केला असावा.

शंकराचार्यांचा आयुष्यकालच अल्प होता व तो कालही सर्वत्र हिंडण्यात, वादविवाद करण्यात व चार मठांची स्थापना करण्यात गेला. अनेक मठ स्थापून त्यांचे कारभारविषयक तपशील ठरविण्यास त्यांना वेळ नव्हता. गोसाव्यांचे मठ उभारण्यास आरंभ झाला असावा तो बहुधा राजस्तानात. राजस्तानात असे म्हणण्याचे कारण, गोसाव्यांना प्रथम राजाश्रय मिळालेला दिसतो तो राजपूत राजांच्या पदरी. पृथ्वीराज चव्हाणाने गोसाव्यांची फौज बाळगली होती व कनोजच्या जयचंदाच्या पदरी गोसावी शरीररक्षक होते असा उल्लेख चांद बरदाईच्या 'पृथ्वीराज-रासा'त आलेला आहे. चितोड गादीचा संस्थापक बाप्पा रावळ हा शैव यती होता व तो हरितमुनी नावाच्या गोसाव्याचा शिष्य होता हे देवदत्त भांडारकरांनी सिद्ध केले आहे. १२ वे ते १५ वे शतक या काळात राजपूत राजाच्या सेवेत जे गोसावी होते त्यांची तुलना राजस्तानचा इतिहास लिहिणाऱ्या कर्नल टॉडने मध्ययुगातील जेरूसलेमच्या सेंट जॉनच्या सरदाराशी (War-Lords) केली आहे. सेंट जॉनच्या सरदारांप्रमाणे हे गोसावी सरदार मठांतून रहात व त्यांना राजांकडून मोठमोठ्या जमिनी मिळालेल्या असत. काही राजपूत राजांनी गोसावी पुरोहितही जवळ बाळगले होते. कर्नल टॉडने मारवाडातील जालोरच्या जालंधरनाथाच्या मुख्य गोसावी पुरोहिताच्या

वैभवाचे वर्णन केले आहे. त्याच्याकडे मिरवणुकीसाठी इतर कोणापेक्षाही जास्त घोडेस्वार होते, असे टॉड म्हणतो. म्हणजे गोसाव्यांचे धार्मिक, लष्करी व आर्थिक वैभव वाढण्यास सुरुवात झाली ती राजस्तानात. पुढे १८व्या शतकात गोसावी अनेक राज्यकर्त्यांना आर्थिक साहाय्य का करू शकले त्याचे बीज येथे दिसून येते. सुरुवातीला या संप्रदायात फक्त ब्राम्हणांस प्रवेश असावा. पण पुढे पुढे त्यात क्षत्रिय व वैश्यांनाही सामील करून घेतले गेले असावे. त्यामुळे धार्मिक, लष्करी व आर्थिक अशा तिन्ही क्षेत्रांत त्यांची प्रगती होऊन तो राजस्तानातून प्रथम उत्तर हिंदुस्थानातील इतर प्रांतात व नंतर दक्षिणेत झपाट्याने पसरला असावा. राजपूत राजांनी आश्रय दिल्यानेही त्या संप्रदायाचे महत्त्व वाढून इतर प्रांतातील राजांनीही त्यांना जवळ बाळगण्यास सुरुवात केली असावी. ही परंपरा थेट १९ व्या शतकाच्या आरंभीच्या काळापर्यंत कायम टिकली. आज मात्र गोसावी संप्रदायाचे महत्त्व स्थानिक पातळीवर घसरल्याचे दिसून येते.

□□□

## १५.

# तंजावरचा राजा अमरसिंह व मराठे

डॉ. सौ. विद्या गाडगीळ,
(कला व वाणिज्य महाविद्यालय, अंबरनाथ, कल्याण.)

---

१८व्या शतकाच्या उत्तरार्धात तंजावर संस्थान कर्नाटक अर्काट, म्हैसूर, इंग्रज, फ्रेंच यांच्या कचाट्यात सापडले. दक्षिणेत चाललेल्या या सत्तास्पर्धेच्या राजकारणात इंग्रज विजयी झाले आणि इंग्रजांची तंजावर संस्थानावरची पकड घट्ट झाली. इंग्रजांच्या कचाट्यातून आपले राज्य वाचविण्यासाठी तंजावरचा राजा अमरसिंह याने धडपड केली. या संदर्भात स्वत: अमरसिंहाने मराठ्यांकडे पाठविलेली पाच अप्रकाशित पत्रे उपलब्ध होतात. ही पत्रे तत्कालीन मराठेशाहीचे आधारस्तंभ नाना फडणीस, महादजी शिंदे, अहिल्याबाई होळकर, तुकोजी होळकर यांना पाठविलेली आहेत. या पत्रांवरून तंजावरकरांना आपल्या दूरस्थ भावबंदाविषयी किती आस्था आणि अभिमान होता आणि आपले स्वकीय आपल्याला मदत करतील याची कशी खात्री होती, हे स्पष्ट होते.

राजा अमरसिंहाने लिहिलेली पाच अप्रकाशित पत्रे तंजावरच्या "सरस्वती ग्रंथालयात" आहेत. ही पत्रे मराठी मोडीत आहेत. या पाच पत्रांपैकी नाना फडणीस, महादजी शिंदे व अहिल्याबाई होळकर, तुकोजी होळकर यांनी पाठविलेली तीन पत्रे तंजावरचे सरदार कृष्णराव महाडीक यांच्या संग्रही आहेत. याच पत्रांविषयी सरस्वती महाल ग्रंथालयाचे माजी सचीव एस. गोपालन् यांनी तामीळ भाषेत लेख लिहिला आहे. [१]

या पाच पत्रांतील आशय तत्कालिन परिस्थितीला अनुसरून आहे. ही पत्रे सुंदर हस्ताक्षरात व चांगल्या कागदावर लिहिलेली आहेत. या पत्रांवर तारीख व साल नाही. परंतु पत्रांच्या आशयावरून या पत्रांचे साल निश्चित करता येते. ही पत्रे इ.स. १७८७ ते १७८९ या काळामधील असावीत. कारण याच काळात राजा अमरसिंह

तंजावरचा राजा होता; याच काळात मराठेशाहीत नाना फडणीस, महादजी शिंदे यांचे महत्त्व वाढले होते आणि तंजावरावरची इंग्रजांची पकड घट्ट झालेली होती. शिवाय महादजी शिंदे यांना लिहिलेल्या पत्रात शके १७११ असा उल्लेख आहे. श्री. महाडिकांच्या संग्रही असलेली पत्रे देवनागरीत लिप्यंतर केलेली आहेत. परंतु मजकूर मात्र मोडी लिपीतील पत्रांप्रमाणेच आहे. पत्रांतील काही अक्षरे अस्पष्ट आहेत.

**नाना फडणीसास पत्र -** हे पत्र मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमेस लिहिलेले आहे. त्यातील महत्त्वाचा मजकूर असा- *''आपण पूर्वीपासून संस्थानचे अभिमानकर्ते +++++++++ नाव हिमसेतूपर्यंत गाजवीत ऐसा पराक्रम असता आम्ही संकटात सापडून हूणाक्रांत होऊन ++++++++ तुम्हास संस्थानचा विचार सर्व विदित आहे. आम्ही बहुत संकटात सापडून श्रमपावेतो ये विषयी विवेक करिनासे चतुर्विध उपायेकडून जैसे साधक होईल तैसे संकट निवारण केले पाहिजे.''*

**महादजी शिंदे यांसी पत्र -** हे पत्र शके १७११ मधील असून अमरसिंहाचा मंत्री नरसिंहराव लिंगोजीराव भोसले याने अमरसिंहाच्या वतीने ते लिहिले आहे. या पत्रात इंग्रजांच्या आक्रमणामुळे तंजावर संस्थान संकटात सापडले आहे असा उल्लेख करून आपण या संकटकाळात आम्हाला मदत करून संकटमुक्त करावे, अशी आग्रहाची विनंतीही केली आहे. या पत्रावरून आणखी एक माहिती मिळते की पहिले इंग्रज-मराठा युद्ध चालू असताना नरसिंहराव भोसले पुण्यात आले होते; त्यावेळेस महादजी शिंदे यांनी तळेगावजवळ इंग्रजांचा कसा पराभव केला, याचा उल्लेख या पत्रात केलेला आहे. राघोबा इंग्रजांकडे गेला तेव्हा तुम्ही जसे मराठ्यांचे राज्य वाचविले तसे आमचे राज्य वाचवावे असे नरसिंहराव लिहितात. पत्रातील महत्त्वाचा मजकूर पुढीलप्रमाणे -

*'संस्थान हुणाक्रांत होऊन बहुत संकट पावतो ह्याचा विस्तार लिहून पुरवेना. पूर्वीपासून आपण संस्थानचे अभिमानी. संस्थानास आतंक आल्यावेळेस परिहार करित आलातच. येसमयी अमचे होईल तैसे संकट निवारण करून किर्ती घेतली पाहिजे.'*

वरील पत्र अतिशय बोलके असून महादजी शिंदे याची स्तुती करताना ते फार मोठे ऐतिहासिक सत्य सांगून जाते. या पत्रात पूर्वी जेव्हा तंजावरावर परचक्र आले तेव्हा महाराष्ट्रातील मराठ्यांनी ते निवारण्याचे प्रयत्न केले होते हे स्पष्ट होते.

**तुकोजी होळकर व अहिल्याबाई होळकर यांसी पत्रे -** या पत्रांतूनही मदतीच्या मागणीचा आशय स्पष्ट होतो. तुकोजी होळकरास लिहिलेल्या पत्रात तुकोजी होळकराकडून कुठलेही उत्तर आले नाही, या विषयी राजा अमरसिंहाने आश्चर्य व्यक्त केले आहे. [२]

नाना फडणीस व महादजी शिंदे यांना लिहिलेल्या पत्रांत इंग्रजाना उद्देशून 'हूण' हा शब्द वापरला आहे, तो मोठा मनोरंजक वाटतो. या सर्व पत्रांत शेवटी ही पत्रे कुमार गुरुपाल स्वामी यांच्याबरोबर पाठवत असल्याचा उल्लेख आहे.

**कुमार गुरुपाल स्वामी -** राजकीय महत्त्वाची पत्रे राजा अमरसिंह हा कुमार

गुरुपाल स्वामी यांचे बरोबर पाठवतो याचाच अर्थ कुमार गुरुपाल स्वामी यांस राजकारणात स्थान असावे, त्यांस तंजावरचा दरबार, इंदोरचा होळकर दरबार आणि पुण्याच्या मराठ्यांचा दरबार येथे प्रवेश होता. कुमार गुरुपाल स्वामी हे कांचीकामकोटी मठाचे प्रमुख होते. [३] कांचीकामकोटी मठाची स्थापना गुरुपाल स्वामी यांनी केली होती. गुरुपाल स्वामी नंतर कांचीकामकोटी पीठाचे व्यवस्थापन गुरुपाल स्वामींचे पुत्र कुमार गुरुपाल स्वामी यांच्याकडे आले होते. कुमार गुरुपाल स्वामी हे राजा अमरसिंहाचे सहाध्यायी होते. मराठा राजे, पेशवे व त्यांचे कारभारी यांच्या बरोबर कुमार गुरुपाल स्वामींचे स्नेहाचे संबंध होते. या स्नेहसंबंधाविषयी तंजावरात एक दंतकथा सांगितली जाते ती अशी की पानिपतावरून नाना फडणीस पळून गंगा नदीवर आले व त्यांनी आत्महत्येचा प्रयत्न केला तेव्हा नाना फडणीसास कुमार गुरुपाल स्वामी यांनी वाचविले. [४]

राजा अमरसिंहाने तुळजाराजा दुसरा याचा दत्तकपुत्र सरभोजी किंवा सरफोजी दुसरा याचा दत्तक अधिकार नाकारून इंग्रजांच्या मदतीने राज्यप्राप्ती करून घेतली होती. (इ.स. १७८७ - १७९८). इंग्रजांची मदत घेतल्यामुळे राजा अमरसिंहास इंग्रजांशी एक अपमानकारक तह करावा लागला. [५] या तहाने तंजावरचे स्वातंत्र्य संपुष्टात आले होते. तंजावरावर खंडणी लादली होती. हा अपमानकारक तह नंतर राजा अमरसिंहास जाचक वाटू लागला. त्यामुळे पेशव्यांच्या मध्यस्थीने राजा अमरसिंहाने खंडणीच्या रकमेत कपात करून घेण्याचा प्रयत्न केला. त्याप्रमाणे त्यास सवलत मिळाली. [६] परंतु ही सवलत अधिक मिळावी, संस्थान संकटमुक्त व्हावे, स्वतंत्र व्हावे असे राजा अमरसिंहास सतत वाटत होते; आणि त्याच उद्देशाने राजा अमरसिंहाने नाना फडणीस, महादजी शिंदे प्रभृतींकडे मदतीची मागणी केली होती हे वरील पत्रांवरून स्पष्ट होते. त्यावेळेस मराठ्यांचे तत्कालीन भारतीय राजकारणातील स्थान श्रेष्ठ होते म्हणूनच राजा अमरसिंहाने मराठ्यांकडे मदत मागितली होती.

मराठे आपल्याला मदत करतील असा विश्वास राजा अमरसिंहास वाटत असावा. त्यावेळी मराठे पूर्ण भारतात अजिंक्य ठरलेले होते. इंग्रजसुद्धा मराठ्यांना घाबरत होते. पहिल्या इंग्रज-मराठा युद्धात (इ.स. १७७५ - १७८२) मराठ्यांनी इंग्रजांचा पराभव केल्यामुळे पूर्ण भारतात मराठ्यांचा, प्रामुख्यानी महादजी शिंदे, नाना फडणीस यांचा, दरारा वाढलेला होता. मराठ्यांचे बळ लक्षात घेऊनच राजा अमरसिंहाने मराठ्यांकडे मदत मागितलेली आढळते.

तथापि राजा अमरसिंहाच्या पत्रांना मराठ्यांकडून उत्तर आलेले आढळत नाही. मराठे या वेळेस टिपूविरुद्ध लढण्यात गुंतलेले असल्यामुळे राजा अमरसिंहाच्या मागणीकडे त्यांना लक्ष देणे जमले नाही. परिणामत: तंजावरचे संस्थान इंग्रजांच्या पूर्ण ताब्यात गेल्याचे आढळते.

तंजावरकरांच्या संकटकालात यापूर्वी मराठ्यांनी वेळोवेळी मदत केल्याचे दाखले

आहेत. तथापि कधी-कधी अंतर्गत परिस्थितीच्या दबावाखाली अथवा शत्रूंशी लढण्यात गुंतल्यामुळे मराठे तंजावरकरांना मदत पाठवू शकले नाहीत. असे असले तरी आपल्या संकटकालात तंजावरकर राजा अमरसिंहाने मराठ्यांकडे मदतीची मागणी करावी ही गोष्ट उभय पक्षांमधील स्नेहभावाची निदर्शक होती, असे नि:संशय म्हणता येते.

## संदर्भ


१. तामीळ विद्यापीठ सेमिनार पेपर्स; (1981 Letters of King Amarsing).

२. तत्रैव.

३. तत्रैव. (लेख- Tanjore Maratha Kings and Kashi Kamkoti math).

४. तत्रैव.

५. इतिहास संग्रह, (तंजावरचे राजघराणे) पृ. ७८

६. तत्रैव.




१६.

# माळव्यातील मराठ्यांची प्रशासकीय व आर्थिक व्यवस्था

डॉ. एन्. एन्. नगराळे
नूतन महाविद्यालय, सेलू, जि. परभणी

---

माळवा म्हणजे भारताचा केंद्रबिंदू आणि शेतीच्या उत्पन्नाचा वैभवसंपन्न प्रदेश. यामुळे या प्रांताने इतिहासकालात आपले विशिष्ट महत्त्व प्रस्थापित केले होते. दिल्लीचे सुलतान, मोगल सम्राट व मराठे ह्या सर्वांनाच माळवा प्रांताबद्दल आकर्षण होते. उत्तर भारतात सैनिकी आक्रमणाच्या वेळीसुद्धा मराठ्यांच्या सैनिकांना रसद उपलब्ध करून देण्यात माळव्याचा प्रदेश हा दुवा म्हणून गणला जात होता. माळव्यात मल्हारराव होळकर, उदाजीराव पवार व राणोजी शिंदे यांच्या अमलाखाली माळवा प्रांत येताच मराठ्यांनी त्या प्रांताची वसाहत वाढविण्याचे व पडित जमिनी लागवडीस आणण्याचे विशेष प्रयत्न केले. [१]

मराठ्यांनी माळव्यात आर्थिक स्थिरतेसाठी केलेली महत्त्वाची सुधारणा म्हणजे पूर्वीच्या बटाई पद्धतीप्रमाणे जमीन-महसूल धान्यांच्या स्वरूपात न घेता रोख पैशाच्या स्वरूपात घेतला जाऊ लागला व माळव्यातील प्रशासकीय-संघटन स्थिर व मजबूत केले. तसेच प्रथम जरी या बहुतेक जमिनीची लागवड सरकारकडूनच होत असली तरी त्यानंतर या जमिनी शेतकऱ्यांस लागवडीकरिता जास्त मुदतीच्या करारान्वये दिल्या जाऊ लागल्या. [२]

पेशवे सरकारने आखून दिलेली शासनपद्धती माळवा प्रांतात चालू होती. परंतु वरील शासनपद्धती कायम ठेवून तिच्यात आणखी बऱ्याच सुधारणा केल्या गेल्या. जमीन

महसुलाचे दर योग्य प्रमाणात कमी केले गेले. गावचे अमलदार व रयत यांच्या जमिनीचे हक्क माळव्यातील मराठ्यांचे सर्वोच्च शासन अत्यंत दक्षतेने सांभाळीत असत. अधिकाऱ्यांशी व रयतेशी वागणूक अत्यंत प्रेमळ असल्यामुळे जमीन - महसुलाच्या वसुलात कधीही कमीपणा राहात नसे. राजपूत, ठाकूर लोकांना नाना तऱ्हेच्या सवलती देऊन त्यांना मराठ्यांनी अंकित करून घेतले; येवढेच नव्हे तर गोंड व भिल्ल जमातीशीही सलोखा करून त्यांनाही अनेक सवलती देऊन प्रसन्न केले. व्यापारी लोकांस उत्तेजन देऊन त्यांच्या धनसंपन्नतेमुळे आपणांस व आपल्या राज्यास मराठ्यांनी धन्य मानून घेतले.[३]

माळव्यातील मराठ्यांचे प्रशासकीय-संघटन व आर्थिक-व्यवस्था हे एक आव्हान होते; कारण हा प्रदेश मराठ्यांच्या शासकांना नवीन होता आणि या प्रदेशातील जुन्या अधिकाऱ्यांच्या ताब्यातील प्रदेश मराठ्यांनी आपल्या ताब्यात घेतल्यामुळे ते सुद्धा मराठ्यांच्या प्रशासकांच्या विरुद्ध होते. एतद्देशीय अधिकाऱ्यांच्या संमतीऐवजी जमीन-महसूल व मालगुजारी सरळ शेतकऱ्यांकडून वसूल करणे अत्यंत अवघड बाब बनली होती. या समस्यांना तोंड देण्याकरिता माळव्यातील मराठ्यांच्या प्रशासकांनी माळव्यातील बिगर मराठा प्रशासकांच्या तुलनेत चोख तसेच स्थानिक अधिकारी आणि रयतेस अनुकूल व आदर्श राहील अशी आर्थिक-व्यवस्था निर्माण केली. त्यामुळे त्यांची प्रशासकीय संघटना आदर्शवत ठरली. केवळ आर्थिक व्यवस्थेमुळेच मराठ्यांचे माळव्यातील राज्य दीर्घकाळापर्यंत स्थिर व लोकप्रिय गणले गेले. माळव्यातील मराठ्यांची प्रशासकीय संघटन व आर्थिक-व्यवस्था खालील प्रमाणे होती.

**प्रधान** - माळव्यातील मराठ्यांच्या प्रशासनातील प्रधान हा मराठी राजाचा माळव्यातील मुख्य सल्लागार आणि सहाय्यक मानला जात होता. प्रधानाची नियुक्ती राजा स्वत:च करीत असे. कधी कधी तर प्रधान राजाचा जहागीरदार आणि पेशव्यांचा मनसबदार सुद्धा राहात असे; त्यामुळे प्रधानाला राजाची सेवा करावी लागत असे, परंतु त्याचबरोबर पेशव्यांची सेवाही करावी लागत असे, प्रधानपद प्राप्त करण्याकरिता इमानदारी हा गुण अनिवार्य समजला जात असे. त्यास राजनीती व रणनीती यांचे ज्ञान आवश्यक होते. प्रधान त्या राज्याचा प्रमुख सेनापतीही असे.[४]

प्रधानाचे कार्य मुख्यत: राजनैतिक होते. राजनैतिक करारमदारासंबंधीचे कार्य त्यालाच करावे लागत असे. प्रधानाचा पेशवे दरबारातसुद्धा सरळ संबंध राहात होता. जर पेशवा दरबाराच्या खालसा क्षेत्रांत एखादे गाव किंवा राज्याचा कोणताही परगणा समाविष्ट करावयाचा असल्यास प्रधानास पेशवे दरबाराशी पत्रव्यवहार व कार्यवाही करावी लागत असे. त्याचप्रमाणे राज्याचे मनसबदार आणि जहागिरदार या सर्वांच्या हालचालीवर त्याचे बारीक लक्ष असे.[५] राज्याच्या राजनैतिक प्रश्नासंबंधी किंवा त्याच्या कार्यवाहीसंबंधी प्रधानास कार्यमग्न राहावे लागत असे.[६] देशदिवाण आणि मराठ्यांच्या सरदारांत मतभेद निर्माण झाल्यास प्रधानाची मध्यस्थी महत्त्वाची समजली जात असे.[७]

१८.

# खान्देशातील सत्यशोधक जलसे

**प्रा. दत्ता परदेशी**
एन्. एन्. सी. कॉलेज, कुसुंबा, धुळे

---

भारतामध्ये अनेक लोककला प्रकार आहेत. प्रत्येक कलेचे एक आपले वेगळे वैशिष्ट्य आहे. भारतीय संस्कृतीचे स्वरूप त्यात दडलेले आहे. बंगालमध्ये जात्रा, कर्नाटकात यक्षगान, उत्तरप्रदेशांत नौटंकी, गोव्यातील दशावतार, महाराष्ट्रात तमाशा, गोंधळ, वाघ्यामुरळी आदी प्रकार आहेत. तसेच लोककलाबरोबर लोकगीते व लोकनृत्यही प्रसिद्ध आहेत.

महाराष्ट्रात तमाशामधून फार्स, गण, लावण्या, वग सादर केला जातो. फार्स हा विनोदी असतो. तर वगामधून सामाजिक, राजकीय, कौटुंबिक किंवा ऐतिहासिक कथा सादर केली जाते. त्यात सामाजिक प्रश्न हाताळलेले असतात. महाराष्ट्रातील जवळपास सर्वांनाच "तमाशा" हा लोकनाट्य प्रकार जवळचा वाटतो. विशेषत: खेड्यापाड्यांत तो विशेष लोकप्रिय आहे.

सत्यशोधक समाजाच्या कार्यकर्त्यांनी आपले विचार लोकांपर्यंत जावेत, म्हणून तमाशाच्या ढंगाचा "सत्यशोधक जलसा" उभा केला. त्यात मनोरंजनापेक्षा आणि अश्लीलतेपेक्षा प्रबोधानाला विशेष महत्त्व दिले. बहुजन समाजातील कलाकारांनी बहुजनांच्या प्रबोधनासाठी सादर केलेली कलाकृती म्हणजे जलसा असे म्हणता येईल.

महात्मा जोतीराव फुले आणि शाहू महाराजांच्या काळात सत्यशोधक विचार सांगणारा सत्यशोधक जलसा प्रसिद्ध होता. सत्यशोधक जलशाने ६०-७० वर्षांपूर्वी वास्तविक परिस्थितीचे वर्णन करून लोकशिक्षण मनोरंजन करण्याचे काम केले. तत्कालीन समाज-व्यवस्था व त्याचा बहुजन समाजावर होणारा परिणाम यातून "जलसा" उभा

राहिला. या सत्यशोधक जलशाचे फार मोठे ऐतिहासिक महत्त्व आहे.

सत्यशोधक जलशांमधून सत्यशोधक विचार मांडले जात. त्यात मुख्य भर हा समाज-प्रबोधनावर होता. सत्यशोधक जलसा म्हणजे काही आखीव-रेखीव कार्यक्रम नसायचा. कलाकार आपली कला मुक्तपणे सादर करीत. लोकांना जागेवर बसवून ठेवायची ताकद सत्यशोधक जलशात होती. अस्पृश्यता मानू नका, शिक्षण घ्या, ब्राह्मणाचे वर्चस्व झुगारून द्या. धार्मिक कामे ब्राह्मणाकडून करू नका, असे आपल्या गीतांतून व संवादांतून लोकांना सांगत.

सत्यशोधक चळवळीचा प्रसार करण्यासाठी हे जलसे गावोगाव फिरू लागले. सामाजिक प्रबोधनाचे एकमेव यशस्वी हत्यार म्हणजे सत्यशोधक जलसा अशी परिस्थिती निर्माण झाली.

त्या काळामध्ये सांगली, सातारा, कोल्हापूर इ. भागांमध्ये भीमराव महामुनींचा जलसा प्रसिद्ध होता. विदर्भात शंकर पाटील यांचा तर बुलढाणा जिल्ह्यात पंढरीनाथ पाटील यांचा जलसा प्रसिद्ध होता. खान्देशातील जळगाव जिल्ह्यात मुरली महानुभाव, रसुल पिंजारी आदिंचा जलसा लोकमान्य झाला होता. धुळे जिल्ह्यात सुद्धा असे अनेक जलसे उभे राहिले होते.

सत्यशोधक जलशांपैकी एक प्रमुख जलसा खोंडामळी ता. नंदुरबार जि. धुळे येथील जुने कार्यकर्ते कै. गोपाळराव माणिकराव पाटील ह्यांचा होता. त्यांचे शिक्षण फक्त मराठी चौथीपर्यंतच झालेले होते. बुद्धीने चलाख व वाचनाची गोडी असल्याने म. फुल्यांचे बरेचसे वाङमय त्यांनी वाचलेले होते.

खोंडामळी येथील व आस-पासच्या गावांत तसेच लग्नकार्यात जलसे होत असत. यात खोंडामळीचे कै. गुलाब करीम पिंजारी, कै. देवराम तुळशीराम पाटील, कै. काशिनाथ गणपत पाटील, कै. सखाराम मंगा पाटील, तुकाराम चिमणा पाटील या जुन्या मंडळींचा समावेश होतो. जलशामध्ये ते सत्यशोधक समाजाची तत्त्वे समजावून सांगत असत. सोप्या भाषेत व संगीताच्या प्रभावाने लोकांना योग्य प्रकारे शिक्षण मिळत असे. जलशाच्या प्रभावामुळे लोक चांगले जमत असत व त्यामुळे सत्यशोधकी प्रचार होत असे.

खोंडामळीपेक्षा जास्त प्रभावी जलसा धाडण्याचा होता (धाडणे ता. साक्री) कै. शिवलाल बुधाजी अहिरराव उर्फ दाजभाऊ व कै. माणिकराव भामरे (मालपूर) हे या जलशाचे प्रमुख होते. त्यांनी जलशाच्या माध्यमातून सत्यशोधक चळवळीचा आपल्या भागात मोठ्या प्रमाणात प्रसार केलेला दिसून येतो. शिवलाल दाजभाऊ लावण्या, पोवाडे, चुटके, अतिशय गोड आवाजात म्हणत आणि मधुनमधून लेक्चर (व्याख्यान) देत. धाडण्याचे कै. भाऊराव मास्तर व कै. उखाजी आण्णाही त्यात होते. सत्यशोधक जलशात ब्राह्मणांवर उघडउघड टीका असे. जुन्या रूढी व अंधश्रद्धा घालविण्यासाठी चरचरीत अंजन असे. ब्राह्मणांचे वर्चस्व कमी करण्याचे उपाय गाण्यांच्या माध्यमातून सांगितले जात. उदाहरणार्थ-

भटजीला हो पिकली पान कळी चुनीदार
शेतकऱ्याला कोरडी तंबाखू चुन्याचा कहर
जात इराणी असून तुमची कसले आले ब्राह्मण
मध्य आशियातुनी आले तरी झाले तुम्ही ब्राह्मण
हे रे कशावरूनी काढले शोधून

हंटर इतिहास पहा वाचुन॥

धाडणे येथील वयोवृद्ध सत्यशोधक कार्यकर्ते श्री. दगा मोतीराम पाटील (जन्म १९०८) यांनी स्वत: शिवलाल दाजभाऊ यांच्या जलशात ''झिलकरी'' म्हणून काम केले आहे. त्यांच्या माहिती वरून हे जलसे खेडो-पाडी फिरत असत. यात शिक्षण प्रसार, जातीभेद निर्मूलन, अस्पृश्यता निवारण व ब्राह्मणी वर्चस्वाला शह असे समान जागृतीचे विषय असत. अशा सत्यशोधक जलशात वरील विषयांस धरून गाणी म्हटली जात. उदाहरणार्थ-

१) कशा वरून म्हणावा ब्राह्मण
कोणता गुण।
दावितसे मतीमंदा लावितसे
आडवा गंधा॥

२) पुंगी घेऊनी वाजवीत फिरतो
त्याला बोलती गारोडी।
मातीचा रुपया क्षणात करतो
खांद्यावरी पोतडी।
जो पंचांग घेऊनी फिरे
ठेवूनिया शिरी।
त्याला ही म्हणू गारोडीचा दुसरा
तांब्यात गंगा करी॥

सत्यशोधक जलशामध्ये गीतांना फार महत्त्व होते. लोकांना गीते आवडत. त्यातून अनेक प्रकारचे सामाजिक प्रश्न मांडले जात. पुरोहितांची वागणूक, धार्मिक विधींचे थोतांड, शिक्षण प्रसार यावर गीत-रचना केली जात असे. समाजातील अनिष्ट प्रथेवर या जलशांच्या माध्यमातून फार्स आणि गीतांच्याद्वारे खूप कोरडे ओढलेले आढळतात. उदा.- अकालीच विधवा झालेल्या तरूण ब्राह्मण मुलीची व्यथा जलशात कशी सांगितली आहे पाहा. ती मुलगी आपल्या बापाला म्हणते-

अण्णा मी तुमची लाडकी।
मला कशाला करता हो बोडकी॥ धृ॥
माझ्या स्वरूपाची तऱ्हा। जसा कोंदणी हिरा।
करितो हा चमचम कि॥ १ ॥

मी किती सुकुमार। जसा फुलांचा हार।
वेणीला शोभती फुले फिरकी॥ २॥
तुम्ही सोडा हट्ट। लावा माझा पाट।
करा बेत तुम्ही हाच की॥ ३॥

त्या काळी हे गीत अतिशय प्रसिद्ध झाले होते. प्रत्येक जलशातून हे म्हटले जात असे.

सत्यशोधक जलशांच्या माध्यमातून समाजामध्ये रूढ असलेल्या वाईट चालीरिती व त्याचप्रमाणे व्यसनांवर सुद्धा गीते सादर केली जात. दारूमुळे संसाराचे कसे नुकसान होते ते दाखविले जात असे. उदा.- दारूड्या नवऱ्याची विनवणी करताना त्याची पत्नी म्हणते-

पतिराया पडते मी पाया।
येऊ द्या माया।
मी तुमची कांता।
मदिरा हि सोडुन द्यावी।
माझी विनंती ऐकावी।
खोड हि वाईट टाकावी।
सख्या ऐका प्राण नाथा।

सत्यशोधक जलशांमध्ये प्रामुख्याने दोन भाग असायचे. प्रारंभी एक भाग गीत, पदे, पोवाडे यांचा आणि दुसरा भाग फार्सचा असायचा. फार्समध्ये समाजातील वास्तविक जीवनाचे दर्शन घडवायचे. त्याद्वारे समाजाला त्यांच्या चुका व त्यावर उपाय सांगितले जायचे. प्रेक्षकांना ते चांगले पटायचे व आपण कुठल्या परिस्थितीत जीवन जगत आहोत याची त्यांना जाणीव व्हायची. त्यामुळे त्यांच्यामध्ये एक प्रकारची प्रबोधनाची शक्ती संचारायची. त्या काळात सत्यशोधक जलशाने बहुजन समाजास एक नव्या क्रांतीचा संदेश दिला. अज्ञानी समाजाला शहाणे करण्याचे काम जलशाने केले. हजारो अज्ञानी माणसे संघटित केली. म. फुल्यांचा समाज सुधारणेचा विचार बहुजन समाजाच्या घराघरात पोहोचविण्याचे कार्य या सत्यशोधक जलशांनी केले, असे म्हटल्यास चुकीचे होणार नाही.

## संदर्भ

१) महात्मा फुले आणि सत्यशोधक जलसे. ले. संभाजी खराट.
२) अखिल भारतीय सत्यशोधक समाज, २२ वे अधिवेशन स्मरणिका,
३) मी असा झालो - (आत्मवृत्त) शंकरराव बेडसे.
मुलाखती : १) श्री. दगा मोतीराम पाटील, रा. भाडगे ता. साक्री, जि. धुळे.
२) प्राचार्य गो. हु. महाजन, धुळे.
३) हिराजी पाटील, धुळे.



# 19.

# The Satyagrah Movement of 1930 in Pen Tehasil

**Prof. R. V. Mehendale**
Birla college, Kalyan, Dist- Thane

---

The Maharashtra Prantik Congress Committee sent G. V. Ketkar to inspire and supervise the Civil Disobedience Movement in Kolaba District. 'Satyagraha Samiti' was established in Panvel about 29 KM. from PEN. Chintaman Shastri Joshi, Appasaheb Vedak, Rambhau Mandalik the vetern freedom-fighters from Pen and Nanasaheb Bedekar of Panvel were given the responsibility of 'Satyagrah.' The Kolaba District Congress Committee appointed - the Satyagrah Samiti and Pen was chosen as a place for the Salt Satyagrah. Maharashtra Prantik Congress Committee appointed Rambhau Mandalik as the "Head of Shibir" and Pen prepared for the first mass satyagrah. Datar Ali and the mill of Rangopant Limaye were the centre of hectic activities, as satyagrahis from all over district started pouring in Pen. (9.3.1930). Chintaman Shastri Joshi and Vishnu Laxman Katre, both from Pen, were sent to Gujarat to take part in 'Salt-Satyagraha' led by Gandhiji. Pen Shibir of Satyagrahis was attended by about 86 Satyagrahis comming from surrounding areas. By the 14th April, 1930 Satyagrahis were gathered for trial action on 30th April, 1930. A procession of Satyagrahis from Hanuman Vyayam Shala Maidan to Kapour Baug was to start on that date. In the noon, Rambhau Mandalik unfurled the flag in the Shibir. G. V. Ketkar and N. C. Kelkar led the procession to Kapur

Baug. The Satyagrahis from all over Kolaba District had taken part in this huge procession. N. C. Kelkar led 'Salt-Satyagraha' and then, the similar action was repeated elsewhere nearby at Alibaug and Panvel.

'The Salt-Satyagraha' was followed by the picketting programme before liquor shops on 31.7.1930. Volunteers lined-up before the liquor shops and prevented the customers to enter the shops. Raghunath Dhondo Sawant, Janardan Keshav Limaye, Laxmidas Morarjee Gujar led this picketting programme. They were arrested and fined by the court. Damale suffered a lot as his property was confiscated by the police. Rounding up of volunteers was done on 9th of April, 1930, when even woman like Smt. Yamubai Mukund Limaye was taken into custody along with many other volunteers. Dattatraya Narayan Dandekar was taken into custody for distributing 'Bulletins', Under Press Act, Article 18, he was given a 6 months R. I. and a fine of Rs. 100/-

Early months of the year 1930 marked the famous 'Jungle Satyagraha'. Janardan Keshav Damale visited areas like village Varasai, Vavoshi, Donavat, Kadu, Pabal to mobilise support from the people for ensuing Satyagraha. He addressed the meetings to clarify the stand taken on this issue. He clarified Govt.'s repressive policies and explained about various laws pertaining to this matter.

He prepared a list of volunteers and put them under local leadership of different villages. Mukund Tilak of Varoshi, Inamdar Brothers of Udhavoli, Shankar Seth, Gujar of Vakarul, Sakharam Patil of Kharav, Ranchhoddas Kankiya of Kasu, Deshpande of Varap, Hiru Mahadu Mhatre of Vashi, Shankar Rama Mhatre of Umbarde, Gujar (Savakar) of Dashmi, Madhavrao Shinde of Hamarapur - all came forward to help volunteers. The brain behind them was naturally a great freedom fighter Janardan Keshav Damale. The Police arrested him on 22.9.1930 under Criminal Procedure Code (Article No. 106 and 107) and sent to Thane Jail.

The arrest of Damale provoked the volunteers and a total Bandh was observed at Horale and Apatee Villages on 25.9.1930. "Grass Cutting Satyagraha" was launched at Chhatishi Area (area under 36 villages) in present Khalapur Taluka, under the leadership of Ganesh Raghunath Limaye. Waman Krishnaji Tilak and Janardan Keroba Bandiwadekar. Wide spread hatred towards the British Rule was witnessed. Government's repressive policies angered the minds of people belonging to peasantry class. The arrested volunteers were brought to Pen and jailed and fined for their action of 'Satyagraha'.

Pen Satyagraha inspired the people of other villages and series of Satyagraha took place in surrounding areas.

At Varsai on 14.10.1930 Narayan Gurav led a huge procession and did the 'Satyagraha.' At Nanegaon, Varawane, Horale villages the same action was repeated.

Then there was a period of total lull for about 2 months. In January 1931. The freedom fighters like Mallanna Dhanashetty, Kurban Hussein, Sarada and Shinde all from Sholapur were hanged to death in Yerawada Jail. The reaction of this was seen at Pen. The Municipal Council of Pen passed a resolution to honour these martyrs and adjourned the meeting in mark of respect to pay homage to them. On 13.1.1931, Police authorities proclaimed article 144 in jurisdiction of Police chowky area of Pen. The freedom volunteers decided to defy the ban and took the procession through the city. The police arrested the leaders like Narayan Yeshwant Nene, Sakharam Raoji Phadke, Gopal Balkrishna Narkar and many others. They were served with judgement of R.I. and fine in cash for defying the Govt. orders. The people unfurled the flag on top of their building.

On 20.1.1931 a programme of flag-hoisting was done openly in Jawahar Maidan. The police rounded up many people and put them into jail.

□□□

# २०.

# चालेजाव चळवळीतील कापडणे येथील कार्यकर्त्यांचे योगदान

**प्रा. मधुकर विक्रम पाटील**
ग. तु. पाटील महाविद्यालय, नंदुरबार- (धुळे)

---

भारताच्या स्वातंत्र्य संग्रामात ऑगस्ट १९४२ हा महिना ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाच्या मानला जातो. मुंबई येथे दि. ७ आणि ८ ऑगस्ट १९४२ रोजी अखिल भारतीय काँग्रेस समितीचे अधिवेशन भरले. या अधिवेशनात भारताच्या विविध प्रदेशातून हजारो कार्यकर्ते उपस्थित होते. या अधिवेशनात स्वातंत्र्य-संग्रामाचे रणशिंग फुंकले जाईल, असे सर्वांनाच खात्रीपूर्वक वाटत होते. त्या रणकुंडात उडी घेण्यासाठी अनेक तरूण मुंबई येथील गवालीया टँकवर जमले होते. उपस्थित असलेल्या श्रोत्यांचे लक्ष म. गांधीजींच्या भाषणात केंद्रित झालेले होते. म. गांधीजी शांत आवाजात परंतु निर्धारपूर्वक जनसमुदायास उद्देशून म्हणाले, "या क्षणापासून तुमच्यापैकी प्रत्येक स्त्री-पुरुषाने आपण स्वतंत्र झालो आहोत, असे समजले पाहिजे. संपूर्ण स्वातंत्र्याशिवाय अन्य कशानेही माझे समाधान होणार नाही. आपण भारताला स्वतंत्र करू किंवा हे भगिरथ प्रयत्न करीत असताना मरून तरी जाऊ." अशाप्रकारे ब्रिटिशांनी भारतातून निघून जावे आणि त्यांना भारतातून घालविण्यासाठी भारतीयांनी स्वातंत्र्य-संग्रामाच्या चळवळीत सहभागी व्हावे असे आवाहन म. गांधीजींनी केले. त्या क्षणापासून असंख्य तरुणांनी स्वातंत्र्य-संग्रामात उडी घेतली.

वर्धा प्रस्तावावर आधारित दि. ८ ऑगस्ट १९४२ रोजी मुंबई येथील अधिवेशनात "छोडो भारत" प्रस्तावास मान्यता देण्यात आल्यानंतर प्रस्तावाची रूपरेषा निश्चित होण्याअगोदरच दि. ९ ऑगस्ट १९४२ च्या पहाटे देशातील अनेक कार्यकर्त्यांना अटक

करण्यात आली. सर्व कॉंग्रेस समित्या बेकायदेशीर ठरविण्यात आल्या. सभा, मिरवणुकीवर बंदी घालण्यात आली. सर्व भारतभर चलेजाव आंदोलन सुरू झाले. महाराष्ट्रात कुलाबा, ठाणे, नाशिक, नागपूर, भंडारा, अमरावती, पुणे, सातारा, जळगाव, धुळे वगैरे जिल्ह्यांत 'चलेजाव चळवळी' चा प्रसार झाला.

दि. ८ ऑगस्ट १९४२ रोजी 'छोडो भारत' हा प्रस्ताव जाहिर केल्यानंतर कॉंग्रेसच्या नेत्यांची धरपकड झाली. इंग्रज सरकारने विविध कायद्यान्वये तुरुंगात डांबणे, खटले भरणे, शिक्षा ठोठावणे सुरू केले. त्यातून अराजकता निर्माण होऊन हिंसक घटना घडल्या.

महाराष्ट्रातील धुळे जिल्ह्यातही चलेजाव चळवळीचे पडसाद उमटू लागले. धुळे जिल्ह्यातील विविध शहरांत चलेजाव चळवळ प्रखर होत असताना धुळे तालुक्यातील कापडणे येथील कार्यकर्त्यांनी मोठ्या धाडसाने इंग्रज सरकारच्या अधिकाऱ्यांना भांबावून सोडले. धुळे जिल्ह्यातील चलेजाव चळवळीतील कापडणे येथील कार्यकर्त्यांचे योगदान उल्लेखनीय आहे. धुळे जिल्ह्यातील ९६७ स्वातंत्र्य-सैनिकांपैकी धुळे तालुक्यात २८६ स्वातंत्र्यसैनिक होते. त्यापैकी १८० स्वातंत्र्य-सैनिकांनी १९४२ च्या चळवळीत भाग घेतला होता. त्यापैकी कापडण्याचे एकूण ८० स्वातंत्र्य सैनिकांपैकी ४६ स्वातंत्र्य-सैनिकांनी १९४२ च्या चळवळीत भाग घेतला होता. त्यात दोन स्त्रियांचा समावेश होता. यावरून कापडणे येथील कार्यकर्त्यांचे चलेजाव चळवळीतील योगदान लक्षात येते.

लवकरच धुळे येथील 'भारत' साप्ताहिकाचे संपादक श्री. अ. वि. टिळक (बाबुराव टिळक), पश्चिम खानदेश जिल्हा कॉंग्रेस समितीचे चिटणीस मुरलीधर मगन भावसार, कापडण्याचे श्री. माधवराव दिवाण, पश्चिम खानदेश जिल्हा कॉंग्रेस समितीचे माजी अध्यक्ष श्री. नवल आनंदा पाटील, शहाद्याचे आमदार श्री. मंगेश भबुता पटेल आणि शिरपूर येथील काही कार्यकर्त्यांना पकडण्यात आले. सरकारचे धरपकडीचे धोरण फक्त शहरांपुरते मर्यादित नव्हते तर ग्रामीण स्तरावरही ते पोहचले होते. कापडणे येथील श्री. भटू नारायण माळी यांनी दि. ९ ऑगस्ट १९४२ रोजी गावात सभा घेतली. त्यात त्यांनी सरकारच्या अत्याचारी धोरणाविरुद्ध जनमत तयार करण्यासाठी भाषण केले. त्या संदर्भात पोलिसांना सुगावा लागल्यानंतर श्री. भटू माळी यांच्यावर खटला भरण्यात आला. त्यांना मॅजिस्ट्रेट पुढे उभे करण्यात आले. राष्ट्रीय-भावनेने प्रेरित झालेल्या या तरुणाने इंग्रज सरकारच्या शिक्षेची पर्वा न करता गुन्हा कबूल केला. इंग्रज सरकारने त्यांना १८ महिन्याची शिक्षा ठोठावली.

चलेजाव चळवळीचा प्रसार करत असताना ब्रिटिश सरकारच्या अधिकाऱ्यांच्या लक्षात येऊ नये म्हणून अनेक कार्यकर्ते भूमिगत झाले. मुंबई येथे भूमिगत झालेले श्री. बाळुभाई मेहता १४ ऑगस्ट १९४२ रोजी दलवाडे येथे येऊन पोहचले. त्यांनी देवमण दादांच्या शेतात प्रमुख कार्यकर्त्यांची सभा घेतली. या सभेत ५० च्या जवळपास कार्यकर्ते उपस्थित होते,

पश्चिम खानदेशातील प्रमुख कार्यकर्त्यांच्या सभेत चलेजाव चळवळीच्या संदर्भात कॉंग्रेसचे धोरण व सरकारची नीती यावर विचारविनिमय झाला. या चलेजाव चळवळीत म. गांधीजींनी उघड बंड करण्यास सांगितले होते. उघड बंडात मोडतोडीचे कार्यक्रम येतात किंवा नाही या बाबतीत मतभेद निर्माण झाले. श्री. बाळुभाई मेहता निश्चित निर्णय देऊ शकले नव्हते. एवढेच नव्हे तर अहिंसात्मक लढ्यात भूमिगत राहाता येते का, असाही प्रश्न निर्माण झाला होता. त्यावर गांधीजींचे जवळचे शिष्य सेवाग्राम येथे वास्तव्य असलेले श्री. किशोरीलालभाई मश्रुवाला यांचे मार्गदर्शन घेण्याचे ठरले. एक प्रश्नावली तयार करण्यात आली. कापडण्याचे विष्णुभाऊ पाटील ती प्रश्नावली घेऊन मश्रुवाला यांच्या भेटीस गेले. श्री. विष्णुभाऊचा श्री. मश्रुवालांशी चांगला परिचय होता. चरखा-संघाचे अध्यक्ष श्री. जाजूजी यांच्या बंगल्यावर दि. १६ ऑगस्ट १९४२ रोजी श्री. विष्णुभाऊ पाटील यांच्यासह प्रमुख कार्यकर्त्यांची सभा घेण्यात आली. त्या सभेत विचारविनियम झाल्यावर पुढील कार्यक्रमांना मान्यता देण्यात आली -

१) भूमिगत राहून चळवळ चालविणे, २) दूरध्वनीच्या तारा तोडणे, ३) रेल्वे रूळ उखडणे इत्यादी. हा उघड बंडात सांगितलेला कार्यक्रम अहिंसेत बसत नसला तरी गांधीजींचे शिष्य सांगतात म्हणून अहिंसेत बसतो असा लोकांचा समज झाला. त्यामुळे अहिंसात्मक लढ्याची जागा हिंसात्मक लढ्याने घेतली. अर्थात त्याचबरोबर या उघड बंडाचा अर्थ पुढीलप्रमाणे केला गेला - या लढ्यात १) सरकारी अधिकारी, कर्मचारी यांनी सामील व्हावे, आपआपली कामे थांबवावीत. २) पोलिसांनी आंदोलकांवर गोळ्या चालवू नये. ३) आगगाड्यांच्या ड्रायव्हरने आगगाड्या चालवू नयेत. ४) सर्व देशभर अहिंसात्मक संप व्हावेत. ५) सरकारी यंत्रणा मोडकळीस आणावी. ६) सरकारी कामे थांबवावीत. ७) शेतकऱ्यांनी आपल्या जमिनीचा शेतसारा देऊ नये इत्यादी.

अशाप्रकारे अहिंसात्मक असहकार म्हणजे उघड बंड असा याचा अर्थ होता. पण श्री. किशोरीलाल मश्रुवाला यांच्या मार्गदर्शनाने चलेजाव चळवळीला हिंसात्मक स्वरूप प्राप्त झाले. पुढे दोन वर्षांनी किशोरीलालभाई यांनी चळवळीच्या नेत्यांना चुकीचे मार्गदर्शन केले म्हणून त्यांनी माफीही मागितली.

देशभक्त श्री. बाळुभाई मेहतांच्या मार्गदर्शनाखाली कार्यकर्त्यांचे जिल्ह्यातील दौरे सुरू झाले. धुळे जिल्ह्यातील भूमिगत चळवळीचे दोन भाग करण्यात आले. कापडण्याचे प्रमुख कार्यकर्ते श्री. विष्णुभाऊ पाटील यांच्यावर धुळे, शिंदखेडा, साक्री, शिरपूर या भागांची जबाबदारी सोपविली. श्री. मेहता यांना अटक केल्यावर चळवळीची जबाबदारी श्री. विष्णुभाऊ पाटील आणि श्री. नानासाहेब ठकार यांच्यावर आली. पण श्री. नानासाहेब ठकार यांनाही सरकारने अटक केली. तेव्हा पश्चिम खानदेशाच्या चळवळीची सूत्रे श्री. विष्णुभाऊ पाटील यांनी स्वीकारून अनेक कार्यकर्त्यांना एकत्रित करून वेगवेगळ्या गावांच्या जंगलात गुप्तपणे सभा घेतल्या. त्यात पुढील निर्णय घेण्यात आले- १) गुप्त पत्रकांचें वाटप करून चलेजाव चळवळीचा संदेश कार्यकर्त्यांपर्यंत पोहचवावा.

२) आगगाडीचे रूळ काढणे, दूरध्वनीच्या तारा तोडणे, दूरध्वनी सेवा निकामी करणे, सरकारी इमारतींना आग लावणे, इत्यादी कार्यक्रमांची आखणी करून निर्णयाची कार्यवाही गुप्तपणे करणे.

भूमिगत नेत्यांना आपला कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी अनेक स्थानिक लोकांच्या सहकार्याची गरज भासत होती. त्यांना चळवळीसाठी पैशाची आवश्यकता होती. ही उणीव भरून काढण्यासाठी अनेक दानशूर दाते पुढे येऊन भूमिगत कार्यकर्त्यांना आर्थिक मदत करून प्रोत्साहित करीत असत. श्री. रामेश्वर शेठ यांनी श्री. विष्णुभाऊ पाटील यांना ऑगस्ट १९४२ च्या शेवटच्या आठवड्यात भेटीस बोलावून ७००/- रुपये त्यांच्या हातावर ठेवले. श्री. विष्णुभाऊ पाटील यांनी त्या पैशाचा उपयोग तारा कापण्याच्या करवती व सरकार-विरोधी कारवाया करताना रात्रींच्या वेळी कोणाच्या लक्षात येवू नये म्हणून काळे कपडे खरेदी केले.

सप्टेंबर १९४२च्या पहिल्या आठवड्यात कापडणे येथील श्री. निंबा दौलत पाटील या कार्यकर्त्याने गावात सभा घेऊन सरकार-विरोधी भाषण केले. इंग्रज सरकारच्या अत्याचारी धोरणाचे वर्णन केले. त्यामुळे स्थानिक जनमत सरकार-विरोधी निर्माण होण्यास मदत झाली.

श्री. आण्णासाहेब सहस्त्रबुद्धे यांनी धुळ्याला भेट देऊन श्री. विष्णुभाऊ पाटील यांच्यासाठी २०००/- रुपये दिले. आण्णासाहेब सहस्त्रबुद्धे प्रामुख्याने मुंबईतच भूमिगत राहिले. तेथूनच महाराष्ट्रभर स्फोटक द्रव्ये, रेल्वे रूळ कापण्यासाठी करवतीची पाती पोहचविणे, मुंबईतच रिव्हालवर तयार करून आवश्यक तेथे पाठविणे आणि त्याच बरोबर महाराष्ट्रभर दौरा करून भूमिगत चळवळीला पैसा पुरविणे इत्यादी कामे ते करीत असत. संपूर्ण देशातील कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांना इंग्रज सरकारने तुरूंगात डांबून ठेवले होते. असे असले तरी चळवळीची तीव्रता कमी न होता वाढतच होती. चळवळ ग्रामीण भागात पोहचली होती. पश्चिम खानदेशातील धुळे तालुक्यातील कापडणे गावाचा तपशीलवार अहवाल डी. एस. पी. पश्चिम खानदेश यांनी डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट पश्चिम खानदेश यांना पाठविला होता. त्या अहवालात डी. एस. पी. पश्चिम खानदेश यांनी कापडणे गावातील सर्व परिस्थितीची चौकशी करून त्या गावातील लोकांनी इंग्रज सरकारच्या दृष्टीने उपद्रवी अशा कारवाया केल्याचा उल्लेख केला होता. त्यात गावातील कार्यकर्त्यांनी दूरध्वनीच्या तारा तोडल्या, जाळपोळ केली, सरकार-विरोधी घोषणा दिल्या, सभा घेतल्या, मिरवणूका काढल्या, शेतसारा भरण्यास विरोध केला, तलाठ्याचे दप्तर चोरून नेले इत्यादींचा उल्लेख आढळतो. त्या अहवालात अधिक पोलीस ताफा पाठविण्याची विनंती केली होती; आणि वेळेवर प्रयत्न केले नाहीत तर सरकार त्या कार्यकर्त्यांना आवर घालण्यास असमर्थ ठरेल असे म्हटले होते. अहवालात पुढील घटना नमूद आहेत -

दि. ७ सप्टेंबर १९४२ रोजी कापडणे येथील सहा युवकांनी धमाणे येथे जाऊन

मिरवणूक काढली. एवढेच नव्हे तर कापडणे गावाजवळ असलेल्या सरवड गावच्या परिसरात जाऊन दूरध्वनीच्या तारा तोडल्या. दि. १७ सप्टेंबर १९४२ रोजी कापडणे येथील मराठी शाळेचे कुलूप तोडून इंग्लंडच्या राजाचे फोटो फोडले. त्यात पाचवा जॉर्ज व आठवा एडवर्ड यांच्या फोटोचा समावेश होता. दुसऱ्या दिवशी कापडणे येथील तलाठ्याचे दप्तर जाळण्याचा प्रयत्न केला पण चावडीवर पहारा असल्याने कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांना दोन-तिनदा प्रयत्न करूनही अपयश आले. दि. २२ सप्टेंबर १९४२ रोजी कापडणे गावाच्या पश्चिमेस असलेल्या आग्रा रोडवरील दूरध्वनीच्या खांबावरून ६०० फूट लांबीची तार तोडून चोरण्यात आली. लगेच चार दिवसांनी याच परिसरातील ५५० फूट दूरध्वनीची तार चोरीस गेली. या तार चोरीचा संशय कापडणे येथील कार्यकर्त्यांवरच आहे. दि. २९ सप्टेंबर १९४२ रोजी कापडणे येथील कन्या शाळेत इंग्लंडच्या राजाचे फोटो लावलेले होते ते फोडण्यात आले. दि. २ ऑक्टोबर १९४२ या गांधी-जयंतीच्या दिवशी कापडणे गावातील नेत्यांनी मिरवणूक काढली, गांधीजींच्या कार्याला पाठिंबा देणाऱ्या घोषणा दिल्या. मिरवणुकीचे नेतृत्त्व करणाऱ्या दोन-तीन व्यक्तींना अटक करण्यात आली. त्यांच्यावर खटला भरून शिक्षा ठोठावण्यात आली. दि. ८ ऑक्टोबर १९४२ रोजी कापडणे गावात ग्राम-पंचायतीने लावलेल्या सार्वजनिक दिव्यांपैकी चार दिवे फोडले. तसेच प्रवासी बस क्र. बी. वाय. पी. ३८५ रात्रीच्या वेळी गावात आल्यावर ती जाळण्याचा प्रयत्न केला. पण अपयश आले. बाजूच्या परिसरात अंधाराचा फायदा घेऊन दूरध्वनीची तार चोरण्यात आली.

कापडणे येथे असलेल्या खादी केंद्रात सरकार आक्षेप घेईल अशी पत्रके श्री. विष्णुभाऊ पाटील आणि श्री. भिका तोताराम वाणी यांनी ठेवलेली होती. पोलीसांनी चौकशी केली असता ती पत्रके सापडली. या संदर्भात श्री. भिका वाणी यांना अटक करण्यात आली, तर श्री. विष्णुभाऊ भूमिगत झाल्याने पोलीस त्यांना पकडू शकले नाहीत.

सोनगीर परिसरातील तार तोडण्याच्या कार्यात श्री. विष्णुभाऊंचा सहभाग होता. तेव्हा त्यांच्या घराची चौकशी केली असता सरकार-विरोधी लिखाण असलेली पत्रके सापडली. पण श्री. विष्णुभाऊ फरार झालेले होते.

दि. २१ ऑक्टोबर १९४२ रोजी श्री. भिका लकडू धोबी यांनी एक सभा घेतली. या सभेस २०० च्या जवळपास लोक उपस्थित होते. सभेमध्ये सरकार-विरोधी विचार व्यक्त करण्यात आले. दि. २३ नोव्हेंबर १९४२ आणि २५ नोव्हेंबर १९४२ रोजी जवळपास ३०० ते ५०० फूट लांबीची दूरध्वनीची तार चोरल्याची घटना घडली. या घटनेच्या संदर्भात पोलिसांनी संशयीत श्री. छगनगिर काळूगिर गोसावी यांना अटक केली. आणि पुढील चौकशीसाठी पाठविण्यात आले. दि. २६ नोव्हेंबर १९४२ रोजी कापडणे येथील तलाठ्याचे घर फोडून दप्तर चोरण्यात आले. त्या संदर्भात दोन लोकांना अटक करण्यात आली. चोरीस गेलेली दप्तरे जाळण्यात आली होती. अर्धवट जळालेल्या

स्थितीत दप्तराच्या काही प्रती मिळाल्या. दि. २९ नोव्हेंबर १९४२ रोजी कापडणे येथील मराठी शाळेवर कॉंग्रेसचा ध्वज फडकविण्यात आला. नंतर पोलीसांनी तो ध्वज खाली उतरविला. दि. ६ ऑक्टोबर १९४३ रोजी कापडणे येथील पोष्टाची पत्र-पेटी चोरीस गेली.

खानदेशातल्या कापडणेसारख्या खेडवजा गावातील क्रांतीकारकांची सरकार-विरोधी कारवायांची कृत्ये पाहता, त्यांच्या ठिकाणी असलेली राष्ट्रीयत्वाची भावना, स्वातंत्र्याची ओढ, पारतंत्र्याची चीड ह्या बाबी प्रकर्षाने नजरेत भरतात. कापडणे आणि तेथील क्रांतीकारक स्वातंत्र्य-सेनानी हे ग्रामीण भारतातील स्वातंत्र्यप्रियतेचे प्रतीक मानावे लागतात. वरील घटनांचा सविस्तर तपशील जो सरकारी दस्त-ऐवजांतून सापडतो त्याचा वृत्तांत मांडण्याचा हा एक प्रयत्न आहे.

## संदर्भ


१. Government of Bombay, Home Department, Special Branch, File No. 1110 (8) B (7) D.S.P. West Khandesh, Dhule , Dated 4th December 1942.

२. Government of Bombay, Home Department, Special Branch, File No. 800 (74) (II) III, West Khandesh Weekly Report - 1942

३. Desai, Sanjiv P. (Editor), Calendar of the Quit India Movement in the Bombay Presedency. August 1985, Publication : Director of Archives, Government of Maharashtra, Bombay.

४. साप्ताहिक 'भारत' - धुळे

५. साप्ताहिक 'प्रबोध' - धुळे

६. जावडेकर, शं. द. - आधुनिक भारत, प्रकाशक : सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणे - २, शके १८९०.

७. प्रधान, ग. प्र. - स्वातंत्र्य संग्रामाचे महाभारत, प्रकाशक : साधना प्रकाशन, पुणे ३०, १९८७.

८. मेहता बाळुभाई - सेवेचे अनुभव, प्रकाशक : परंधाम प्रकाशन, पवनार, वर्धा, १९७४.

९. डॉ. कुंटे, भ. ग. - स्वातंत्र्य सैनिक चरित्र कोश, महाराष्ट्र राज्य, पश्चिम महाराष्ट्र, खंड १, कार्यकारी संपादक व सचिव दर्शनिका विभाग, महाराष्ट्र शासन.

१०. भारतीय इतिहास आणि संस्कृती - जुलै ते डिसेंबर १९८५ अंक नंबर ८६-८७, प्रकाशक : मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या इतिहास संशोधन मंडळाचे त्रैमासिक.


□□□

२१.

# आचार्य श्रीराम शर्मा - म. गांधींचा सच्चा अनुयायी

प्रा. सी. एम्. भावसार
श्रीमती हेमंतबेन पटेल महिला महाविद्यालय, शिरपूर (धुळे)

---

आचार्य श्रीराम शर्मा यांनी हरिद्वार येथे ऋषीकेश रोडवर हरिद्वारपासून ६ कि. मी. अंतरावर एक तीर्थरूप आश्रम उभारला आहे. 'शांतिकुंज' या नावाने हा आश्रम सर्वत्र ओळखला जातो. या आश्रमाच्या जवळच 'ब्रम्हवर्चस शोध संस्थान' आचार्य श्रीराम शर्मा यांनी स्थापन केलेले आहे. मी स्वत: शांतिकुज व ब्रम्हवर्चस येथे सातवेळा जाऊन आलो आहे. ह्या आश्रमाला जवळून पाहिले आहे. हे पाहताना महात्मा गांधीजींच्या विचारांची अनेक ठिकाणी आठवण होते.

**खऱ्या समाजवादाचे दर्शन** - महात्मा गांधी लिहितात, "आदर्श परिस्थितीमध्ये भंगी व बॅरिस्टर यांना समान वेतन मिळेल." मला हे गांधीजींचे विचार शांतिकुंजमध्ये दिसून आले. या आश्रमात मोठमोठे विद्वान समर्पित भावनेने काम करीत आहेत. येथे M. D., M. B. B. S., B. A. M. S., M. Sc., Ph. D. झालेले अनेक विद्वान संशोधनाचे कार्य करीत आहेत. ते वेळप्रसंगी झाडू लावण्याचे व सफाईचे कार्य करीत असतात. त्यांच्यात स्वयंसेवकांचे गुण भरलेले आहेत. या विद्वानांनासुद्धा तेवढाच पगार मिळतो जेवढा तेथील एका सामान्य कार्यकर्त्याला मिळतो. पोट भरण्यासाठी एका व्यक्तीला एका महिन्याला एकशेवीस रुपये पुरेसे होतात असे गुरुदेव आचार्य श्रीराम शर्मा यांना वाटत होते. त्यामुळे या विद्वानांनासुद्धा एकशेवीस रुपये पगार मिळतो. सर्वच कार्यकर्त्यांना तेथे समान वेतन मिळते. येथे कोणत्याही प्रकारच्या सेवा-ज्येष्ठतेचा विचार होत नाही. अगदी नव्याने आलेल्या कार्यकर्त्यांच्या पगारात आणि अनेक वर्षांपासून काम करीत

असलेल्या कार्यकर्त्यांस सारखाच पगार मिळतो. जर एखाद्या कार्यकर्त्यावर जास्त लोक अवलंबून असतील तर त्या प्रमाणात त्याला पगार जास्त मिळतो व राहण्यास खोल्याही जास्त दिल्या जातात. परंतु अनेक वर्षांपासून काम करीत असलेल्या कार्यकर्त्यांवर जर कोणीही अवलंबून नसेल तर त्यास एक खोली व १२० रुपये पगार मिळतो. येथील कार्यकर्तेसुद्धा समर्पित आहेत. ते जरूरीपुरताच खर्च करणारे व दिसेल ते काम करणारे स्वयंसेवक आहेत. अत्यंत अल्प व आत्मसंतुष्ट आहेत. खऱ्या समाजवादाचे दर्शन या आश्रमात होते असे म्हटल्यास चुकीचे होणार नाही.

**स्वेच्छा गरिबी -** आचार्य श्रीराम शर्मा यांच्यावर महात्मा गांधीजींच्या विचारांचा प्रभाव शंभर टक्के पडलेला असल्याचे दिसून येते. महात्मा गांधीजींच्या विचारांचे अनुकरण आचार्यांनी मनापासून केलेले आहे. महात्मा गांधी लिहितात, ''ज्या लोकांमध्ये माझे सारे जीवन जावयाचे आहे आणि ज्यांच्या अडचणी मी रोजरोज पाहत आहे त्यांची सेवा जर मला करावयाची असेल, तर मी माझी सारी संपत्ती, माझा सारा परिग्रह यांचा त्याग केला पाहिजे.'' या विचारातून गांधीजींनी आपल्या सर्व संपत्तीचे दान केले. ते पुढे म्हणतात, ''मी माझे सर्वस्व पूर्वीच देऊन टाकले आहे. इतरांनी कसे वागावे असे मला वाटते, याचा हा पुरावा आहे.'' गांधीजींच्या ह्या विचारांचाच परिणाम आचार्य श्रीराम शर्मा यांच्यावर झालेला दिसतो. त्यांनी गांधीजींप्रमाणे स्वेच्छा गरीबी धारण केलेली दिसते.

आपल्या वडिलोपार्जित संपत्तीचा उल्लेख आचार्य श्रीराम शर्मा करतात, ''पैतृक सम्पदा इतनी थी की उसके सहारे तीन पीढीतक घर बैठकर गुजारा हो सकता था।'' यावरून आचार्य श्रीराम शर्मा यांच्या घरच्या परिस्थितीची कल्पना येते. त्यांची घरची जमीनदारी होती. दोन हजार बिघे जमीन होती. किल्ल्यासारखे घर त्यांच्या पूर्वजांनी बांधून ठेवले होते. या सर्व ऐश्वर्याचे आचार्यजींनी दान केले. आपली पैतृकसंपत्ती स्वेच्छेने दान करून अत्यंत गरिबीत त्यांनी जीवन जगायला सुरुवात केली. संपन्नतेला त्यांनी विचारपूर्वक धुत्कारले.

**अस्पृश्यता व जाती - भेद निर्मूलन -** आचार्य श्रीराम शर्मा हे जातीबंधने पाळत नव्हते हे त्यांच्या किशोर अवस्थेतील लीलांमधून जाणवते. छपको नावाची एक हरिजन महिला आवलखेडा येथे त्यांच्या गावाला आजारी पडली. त्यावेळी त्यांचे वय तेरा वर्षांचे होते. ही महिला म्हातारी होती. तिच्या हाताला जखमा झालेल्या होत्या व त्या खूप चिघळत होत्या. त्यात किडेसुद्धा पडले होते. ती वेदनांमुळे जोरजोरात ओरडत होती. परंतु ती अस्पृश्य असल्यामुळे कोणी तिच्या घरात शिरत नव्हते. तिला जुलाबसुद्धा होत होते. डॉक्टरांना विचारून आचार्य श्रीराम शर्मा यांनी तिच्यासाठी औषध आणले. ही घटना १९२३-२४ मधील आहे. त्या काळात अस्पृश्यांच्या सावलीचा सुद्धा विटाळ होत असे. अशा काळात हरिजन महिलेच्या घरी जाऊन तिची जखम धुणे, मलम पट्टी करणे, औषध देणे, जेवण देणे, तिच्या मलमुत्राचे कपडे धुणे ही

एक क्रांतिकारी गोष्ट होती. एक गांधीजींचा सच्चा अनुयायीच एवढ्या धाडसाचे काम करू शकणार होता. आपल्या बालवयात घरच्या कर्मठ लोकांच्या विरोधाला न जुमानता, गावातील सर्व लोकांचा विरोध पत्करून, जातीबाहेर, घराबाहेर टाकल्यावरसुद्धा आचार्यजी नियमितपणे छपकोकडे जात होते व तिची सेवा करीत होते. पंधरा दिवस यांनी तिची सेवा केली. त्यानंतर ती जितके दिवस जगली तितके दिवस आचार्यजींना ती देव मानत होती.

आचार्यजींनी अस्पृश्यांसाठी काय केले याची साक्ष शांतिकुंज देते. एक काळ असा होता की ज्यावेळी हरिजनांना, आदिवासींना, देवळांत जाण्यास उच्चवर्णियांनी, ब्राम्हणांनी, पंडितांनी मनाई केली होती. परंतु ह्या भू-तलावर आचार्य श्रीराम शर्मा यांच्या रूपाने असा उच्चवर्णीय अवतीर्ण झाला की ज्याने सर्व हरिजन-गिरीजनांना केवळ मंदिरात प्रवेश खुला केला नाही तर त्यांना आपले शिष्य केले. गायत्री साधना शिकविली. यज्ञ-विधी शिकवून त्यांनाच ब्राम्हण केले. जे मंदिरात जाऊ शकत नव्हते ते मंदिराचे पुजारीसुद्धा बनू लागले. पुरोहिताचे कार्य करू लागले. आचार्यजींचा आश्रम हा सर्व जाती-धर्मासाठी खुला आहे. तेथे प्रशिक्षण घेणारे कोणत्या जातीचे आहेत ह्याची कधीही चौकशी होत नाही. परिव्राजकाचे प्रशिक्षण त्यामुळे कोणत्याही जातीच्या धर्माच्या व्यक्तीला मिळत असते. आचार्य श्रीराम शर्मा यांनी तीन हजार शक्ती-पीठांची स्थापना केली आहे. ह्या सर्व शक्ती-पीठांमध्ये जे परिव्राजक आहेत ते सर्व शांतिकुंज हरिद्वार येथे प्रशिक्षण घेऊन आलेले आहेत. यावरून आचार्यजींनी अस्पृश्यांबाबत केवढा क्रांतिकारी सामाजिक बदल घडवून आणला व गांधीजींच्या विचारांना कसे मूर्तरूप दिले हे स्पष्ट होते.

**ग्रामोद्योग व लघु-उद्योग -** महात्मा गांधीजींनी लघुउद्योगांना प्राधान्य दिले होते. खेड्यांतून तयार करता येतील असे अनेक उद्योग त्यांनी सांगितले आहेत व ते खेड्यांतून उत्पादित व्हावेत अशी त्यांची इच्छा होती. घाण्यातून तेल काढणे, हातसडीचे तांदूळ, ताडगुळ, मध, खेळणी, चटया, हात-कागद, साबण ह्या वस्तू गांधीजींनी सांगितल्या आहेत. आचार्यजींनी "बुनता घरांची" आवलखेड्यात स्थापना केली व १९३१मध्ये गांधीजींच्या विचारांचे बीज पेरले. या बुनता घराच्या प्रयोगाने आचार्यजींनी लोकांमध्ये स्वावलंबनाची प्रेरणा भरली. आसपासच्या गावातील लोकांना सूतकताईची प्रेरणा दिली, खादी विणण्याचे काम त्यांनी आपल्या गावातील लोकांना शिकविले. गांधीजींची स्वदेशीची चळवळ अशाप्रकारे आचार्यजींनी खऱ्या अर्थाने आपल्या गावात यशस्वी केली.

बुनता घराच्या रूपाने आचार्यजींनी आवलखेड्यात गांधीजींच्या विचारांना मूर्तरूप दिले. त्यावेळी ते बीज रूप होते असे म्हटल्यास शांतिकुंजच्या रूपाने ते अतिविशाल व अनेक फांद्या-उपफांद्या असलेला वृक्ष झाल्याचे जाणवते. शांतिकुंजमध्ये अनेक उद्योगधंदांच्या प्रशिक्षणाची सोय आचार्य श्रीराम शर्मा यांनी केलेली आहे. तेथे त्यांनी स्त्रियांसाठी स्वालंबन विद्यालय सुरू केले आहे. त्यात मधुमख्खीपालन, सजावटके सामान,

खिलौना निर्माण, हाथ कर घा, कपडा बुनाई, सिलाई उद्योग, अगरबत्ती, प्रिन्टिंग प्रेस, रबर स्टॅम्प, अम्बर चरखा, मोमबत्ती, प्लॅस्टीक मोल्डिंग, पेन, रिफील, बटन, नाडा, फिता, फोटोग्राफी, फोटोलॅमिनेशन, स्क्रीनप्रिंटिंग, साबूनिर्माण, केशकर्तन, बेकरी, पापड, लेमन ज्यूस हे उद्योग शिकविले जातात.

'गायत्री तपोभूमी' मथुरा येथे सुद्धा विद्यार्थ्यांना स्वावलंबी शिक्षण मिळावे म्हणून आचार्यजींनी गुरुकुल पद्धतीचे विद्यालय सुरू केले आहे. मी तेथील शिक्षकांची, विद्यार्थ्यांची आणि प्राचार्यांची मुलाखत घेतली आहे. तेथे वीज उद्योगात विजेची फिटिंग, दुरुस्ती, विद्युत सजावट, रेडियो-ट्रान्झीस्टर दुरुस्ती, टेपरेकॉर्डर रिपेअरिग, कुटिर उद्योगात-साबण व साबणाची पावडर बनविणे, मेणबत्ती बनविणे, अगरबत्ती बनविणे, फोटोफ्रेम, रबर स्टॅम्प, मंजन तयार करणे, प्रेस उद्योगात कंपोजिंग, प्रिंटिंग, बायंडिंग, प्रेस-संचालन व्यवस्था यांचे प्रशिक्षण देऊन लोकांना अधिकाधिक स्वावलंबी करण्याचे गांधीजींचे स्वप्न आचार्य श्रीराम शर्मांनी साकार केलेले दिसते.

**प्रौढ शिक्षण -** गांधीजींनी स्वातंत्र्य चळवळीसाठी जे अनेक उपक्रम आखले होते त्यात प्रौढ शिक्षण हा सुद्धा एक उपक्रम होता. त्या काळात गांधीजींच्या प्रेरणेने सर्व देशात ठिकठिकाणी प्रौढ शाळा चालू होत्या. १९३३ मध्ये आचार्यजींनी आपल्या घरी आपल्या आईला व तिच्या वयाच्या महिलांना अक्षरांचे ज्ञान, हिंदी, ऊर्दू, संस्कृत शिकविले. त्यावेळी त्यांच्या गावात अशी चर्चा होती की, पंडितजींच्या घरी शाळा चालते व श्रीराम स्वत: मोठ्या आणि म्हाताऱ्यांना शिकवितो. आचार्य श्रीराम शर्मा यांचे सहयोगी मा. घमण्डीलाल, राहणार आवलखेडा हे आपल्या भेटवार्तेत लिहितात, ''आचार्य श्रीराम शर्मा यांच्या वाचनालयातसुद्धा मी काम करीत होतो. आचार्यजी जे पुस्तक देत ते दुसऱ्या गावात वाचण्यासाठी मी नेत होतो. आणि एक आठवड्यानंतर ते परत आणत होतो. तसेच दुसऱ्या गावातील अशिक्षित मुलांना शिकविण्यासाठीसुद्धा मी जात होतो. जे प्रौढ अशिक्षित होते त्यांना सुद्धा शिकविले जात होते. आचार्यजींनी हा उपक्रम त्या काळापुरताच मर्यादित ठेवला नाही तर त्यांनी युगनिर्माण योजनेच्या शतसूत्री कार्यक्रमात सुद्धा प्रौढ शिक्षणाला स्थान दिले. प्रज्ञा संस्थानात म्हणजेच शक्तिपीठात बालसंस्कार शाळा आणि प्रौढ शाळा चालविल्या.

**आदर्श विवाह -** महात्मा गांधीजींना हुंड्याची चाल क्रूर व हृदयशून्यतेची वाटत होती. त्यामुळे हुंड्याची चाल बंद झाली पाहिजे असे त्यांचे मत होते. गांधीजींचे हे स्वप्न आचार्यजींनी साकार करण्याचा प्रयत्न केल्याचे 'आदर्श विवाह विशेषांक' (१९७७) च्या पानापानातून दिसून येते. गांधीजींना असे वाटत होते की, ''विवाह हा धार्मिक विधी आहे. वर व वधू यांचा तो नवा जन्म आहे. तो जितक्या धार्मिक वातावरणामध्ये केला जाईल तितके त्यांच्या दृष्टीने अधिक चांगले. थाटमाट सोडून शांततेने राहून असे वातावरण तयार केले पाहिजे.'' गांधीजींची ही सुद्धा इच्छा आचार्यजींनी पूर्ण केलेली आहे. अत्यंत साध्या पद्धतीने, शांततेच्या आणि धार्मिकतेच्या वातावरणात, अत्यंत

अल्प खर्चात त्यांनी अनेक आदर्श विवाह शांतिकुंजमध्ये लावले आहेत. तसेच गायत्री शक्तिपीठातूनसुद्धा अशा आदर्श विवाहांना फार मोठी चालना मिळालेली आहे. त्यामुळे हुंडा-प्रथा व विवाहातील अनाठायी खर्च ह्या अनिष्ट प्रथांचे निर्मूलन होण्यास फार मोठी मदत झाली आहे.

**अध्यात्म -** अध्यात्माच्या क्षेत्रात सुद्धा गांधीजींच्या ह्या सच्च्या अनुयायाने फार मोठी कामगिरी केलेली आहे. गांधीजी लिहितात, ''मी त्या अनंताचा एक अंश आहे आणि तरी इतका य:कश्चित अंश आहे की मी त्याच्या बाहेर असल्यासारखे मला वाटते. जरी मी तुम्हाला हे बौद्धिक स्पष्टीकरण देत असलो तरी त्या दैवीशक्तीशी एकरूप न झाल्यामुळे मला आतून मी इतका क्षुद्र वाटतो की मी काही नाहीच. मी अमूक करतो, तमुक करतो असे मी म्हणू लागताच मला माझी अपात्रता आणि य:कश्चितपणा प्रतित व्हायला लागतो आणि वाटू लागते की दुसऱ्या कोणीतरी, कोणा उच्चतर शक्तीने, मला साहाय्य केले पाहिजे.'' ह्या दैवी शक्तीशी एकरूप होण्यासाठी गांधीजींना उच्चतर शक्तीच्या साहाय्याची गरज भासत होती, हे स्पष्ट होते.

आचार्य श्रीराम शर्मा या त्यांच्या सच्च्या अनुयायाने अध्यात्माच्या क्षेत्रातील ती पात्रता जीवनभर तपश्चर्या करून विकसित केली होती. आणि ते त्या दैवी शक्तीशी एकरूप झाले आणि स्वत: एक उच्चतर शक्ती बनले असे दिसून येते. ज्या शक्तीच्या साहाय्याची महात्मा गांधीजींनी अपेक्षा केली होती ती शक्ती त्यांच्या अनुयायाने संपादन केली होती. आणि लाखो लोकांचे दु:ख दूर करण्यासाठी ते त्या शक्तीचा विनियोग पुढील आयुष्यात करू लागले होते. स्वत:ला मोक्ष मिळावा म्हणून त्यांनी ही साधना केली नाही, तर अनेकांना मोक्ष मिळवून देण्यासाठी त्यांनी आपल्या शक्तीचा उपयोग केला. अनेक दु:खी कष्टी लोकांचे अश्रू पुसण्यासाठी त्यांनी ह्या शक्तीचा उपयोग केला.

## संदर्भ-ग्रंथ

१. गांधी विचार दर्शन - अर्थकारण, भाग १३.
२. हमारी वसीयत और विरासत - आचार्य श्रीराम शर्मा.
३. अखण्ड ज्योति स्मृति विशेषांक - ऑ. सप्टें. : १९९०.
४. गायत्री विशेषांक
५. श्रीराम शर्मा आचार्य विवरणिका.
६. पं. श्रीराम शर्मा आचार्य : व्यक्तित्व एवं कर्तृत्त्व - बलरामसिंह परिहार
७. गांधी विचार दर्शन, स्त्री जीवन, भाग ६
८. गांधी विचार दर्शन, धर्म विचार, भाग १६



## २२.

# श्री. शंकर श्रीकृष्ण उपाख्य नानासाहेब देव यांचे संशोधन कार्य

**प्रा. सर्जेराव भामरे**
जी. टी. पाटील महाविद्यालय, नंदुरबार (धुळे)

---

महाराष्ट्रात १९ व्या शतकाच्या मध्यापासून संशोधन कार्यास प्रारंभ झाला. पुण्या - मुंबईच्या नव - सुशिक्षितांनी यात पुढाकार घेतला. हे लोण ग्रामीण भागातही पसरले. धुळ्यासारख्या ग्रामीण आदिवासी भागातील तरुणांनाही संशोधनाच्या क्षेत्राची जाणीव झाली व त्यांनीही संशोधन करून त्या क्षेत्रात आपल्या कार्याचा ठसा उमटविला. खान्देशामध्ये श्री. शंकरराव उपाख्य नानासाहेब देव, भा. वा. भट व चांदोरकर यांनी अतिशय भरीव कामगिरी संशोधन-क्षेत्रात केली आहे. पण त्यांनी केलेल्या कार्याची दखल समाजाने फारशी घेतली नाही, त्यांच्या संशोधन कार्याची उपेक्षा झालेली आहे.

स्वातंत्र्याची ललकार देण्याकरिता 'निबंधमाला' जन्माला आली. टिळक-युगाचे रणशिंग निबंधमालेने फुंकले. त्यामुळे महाराष्ट्रात सारस्वताची अस्मिता उजळून निघाली. ''केसरी, मराठा'' या वृत्तपत्रांनी भारतीय वृत्तपत्र-सृष्टीत अभूतपूर्व क्रान्ती केली. निबंधमाला कर्त्यापुरुषांची स्फूर्तीगंगा ठरली. महाराष्ट्रातील पहिले सुवर्णयुग ज्ञानेशांचे, दुसरे शिवसमर्थांचे आणि तिसरे लोकमान्य टिळकांचे. या तिन्ही सुवर्ण युगांनी भारताच्या इतिहासात युग-प्रवर्तन केले.

याच कालखंडात इतिहास या क्षेत्राला मोठे ऐश्वर्य लाभले. चिपळूणकरांच्या 'इतिहास' या निबंधाने ऐतिह्य कालखंडाची तुतारी फुंकली आणि आमचा इतिहास हा गौरवशाली आहे, ही ग्वाही मिळाली. का. ना. सान्यांनी 'सभासदाच्या बखरीपासून तो

पेशव्यांच्या बखरी' अखेर साऱ्या बखरींचे साक्षेपाने संपादन केले. वासुदेवशास्त्री खऱ्यांनी "मळेकर दप्तर" खुले केले. त्यांचे 'नाना फडणीसाचे चरित्र' गाजले. रा. ब. पारसनीसांनी सातारा येथे संशोधन दालन उघडले आणि "राणी लक्ष्मीबाईचे" चरित्र लिहून इतिहासावर आपला ठसा उमटविला. इतिहास-महर्षी सरदेसाई यांनी आपल्या 'रियासती' याच कालखंडात लिहिल्या. डॉ केतकरांनी 'ज्ञानकोशाचा' आखाडा याच वेळी मांडला. भारताचार्य चिंतामणराव वैद्यांनी याच वेळी 'महाभारताचा उपसंहार' लिहिला. चिपळूणकर मंडळीनी भागवत, रामायण, योगवसिष्ठ या सर्व ग्रंथांना गद्य लेणे चढविले. परंतु ऐतिह्य कालखंडाला चैतन्यपूर्ण आणि ज्वलन्त स्वरूप आणले ते राजवाड्यांनी. इतिहासाचार्य राजवाड्यांनी 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' हे २२ खंड आपल्या अपूर्व प्रतिभेने निर्माण केले. अस्सल कागदपत्रे जिवंत कशी असतात याचे चलतचित्र त्यांनी वाचकांपुढे उभे केले. त्यांच्या एकेका खंडाची प्रस्तावना म्हणजे ऐतिह्य कालखंडाचा स्वतंत्र ग्रंथच होय. राजवाड्यांना या भारतभूच्या पारतंत्र्याची चीड होती. इतिहास हा घटकावयव उर्जितावस्थेकरिता असतो ही त्यांची श्रद्धा होती. रामदासी संशोधनाचा पाया ह्याच कालखंडात घातला गेला तो इतिहासाचार्य राजवाड्यांच्या 'रामदास' या निबंधाने. राजवाड्यांच्या या कार्यातूनच नानासाहेब देवांना इतिहास संशोधनाची प्रेरणा मिळाली.[२]

नानासाहेबांना लोकमान्य टिळक, गोपाळराव गोखले, वासुदेवराव केळकर, वामनराव आपटे, आगरकर, डॉ. भांडारकर, कर्मयोगी कर्वे या महान शिक्षकांनी घडविले (१८९० ते १८९३).[३] टिळक व गोखले यांच्याशी नानासाहेबांचे जिव्हाळ्याचे ऋणानुबंध होते. लोकमान्यांचे तर ते भक्तच होते. लोकमान्यही त्यांना ममतेने वागवीत. ते त्यांच्याशी चर्चा करीत व उत्तेजन देत. नानासाहेबांचे काही लेख सुद्धा यावेळी केसरीमध्ये आलेले आहेत.[४]

नानासाहेबांच्या आयुष्यातील महत्त्वपूर्ण टप्पा म्हणजे धुळ्याची 'सत्कार्योत्तेजक सभा'. या संस्थेच्या स्थापनेमुळे नानासाहेबांच्या राष्ट्रसेवेच्या लौकिक कार्य-प्रपंचाचा श्रीगणेशा झाला. (१९ मे शुक्रवार १८९३) यावेळी नानासाहेब म्हणाले होते, 'देशांतील तरुण मुलांस वाट दाखविण्यासाठी व त्यांचे ध्येय जागृत ठेवण्यासाठी आता यापुढे अशा संस्थांची प्रत्येक जिल्ह्यात आवश्यकता आहे" या सभेमुळे तरुणांच्या कार्योत्साहाला उधाण आले.[५] श्री शिवजन्मोत्सव, श्री गणेशोत्सव, दसरा सम्मेलन यासारखे राष्ट्रीय-उत्सव साजरे करणे, ध्येयदृष्ट्या महत्त्वाचा ग्रंथ नेमून त्याचा सर्वांकडून अभ्यास करवून चर्चा घडवून आणणे, व्याख्यानमाला गुंफणे, वक्तृत्व स्पर्धा भरविणे, राष्ट्र पुरुषांचे स्मरणोत्सव करणे, मराठीच्या परीक्षा घेऊन बक्षिसे देणे हे ध्येय समोर ठेवून नानासाहेबांच्या नेतृत्वाखाली सभेने कार्य सुरू केले.[६] तसेच 'आर्यावर्त' नावाचे राष्ट्रीय धोरणाने चालणारे वृत्तपत्रही नानासाहेबांनी सुरू केले. त्यांनी पुण्यातील टिळकांच्या 'लॉ क्लास' प्रमाणे धुळ्यातही लॉ-क्लास चालविला होता. तो म्हणजे राष्ट्र जागृतीचे एक केंद्रच होता.[७]

नानासाहेबांनी सभेमार्फत १८८९ ला पुण्यातील चित्रशालेत छत्रपती "श्री शिवाजी महाराज व श्री शिवजन्मोत्सव" हे पुस्तक छापून प्रसिद्ध केले.[८] धुळ्यास 'महाराष्ट्र वैदिक इंग्रजी शाळा' या राष्ट्रीय माध्यमिक पाठशाळेचीही त्यांनी स्थापना केली.[९] सन १९०५ साली नाशिक येथे श्री शिवजयंती उत्सवात नानासाहेबांना मुख्य वक्ते म्हणून मित्र-मेळ्याने बोलाविले होते. ऐतिहासिक सत्याची ज्वलजहाल व्याख्याने ऐकणारे नाशिककर नानासाहेबांची ती साधी, सडपातळ मूर्ती पाहून आपसांत कुजबुजू लागले की, गबाळ फेटा गुंडाळलेले हे वक्ते काय बोलणार! पण व्याख्यानाचा विषय समर्थांच्या ओजस्वी शब्दांत जसजसा विवेचिला जाऊ लागला, तसतसे नाशिककर तरुण अविचल स्थितीत मुग्ध होऊन गेले आणि शेवटी शेवटी तर प्रत्येकाचे हृदय गहिवरल्याशिवाय राहिले नाही.[१०]

'जपानची मर्दुमकी' हे पुस्तक १९०५ साली सभेमार्फत नानासाहेबांनी प्रकाशित केले. लो. टिळकांनी या पुस्तकाचे कौतुक केले. तीन वर्षात त्याची दुसरी आवृत्ती काढावी लागली.[११] नानासाहेबांकडे लो. टिळक, म. गांधी, अरविंद घोष, राजगोपालाचार्य, मोतीलाल नेहरू, सरोजिनी नायडू, सरदार पटेल, मदनमोहन मालवीय, दादासाहेब खापर्डे, श्री. दादा महाराज, श्री. चौंडे महाराज इ. थोर मंडळी राहून गेली आहेत.[१२]

स. १९०५ ते १९२५ हा कालखंड नानासाहेबांच्या राष्ट्रीय, राजकीय, धार्मिक व सामाजिक कार्याचा उत्कर्ष-काल होता. ते खान्देशाचे भाग्यपुरुष म्हणून गणले जाऊ लागले. राष्ट्रीय कार्यात तर ते उत्तर महाराष्ट्राचे एकमात्र नेते होते. त्यांच्या प्रयत्नामुळेच राष्ट्रीय सभेची प्रांतिक परिषद (स. १९०८) भरविण्याचा मान धुळ्यास मिळाला. ते तिचे कार्याध्यक्ष होते. (या परिषदेस लो. टिळक, अरविंद घोष इ. मान्यवर आले होते). अशाप्रकारे उत्तर महाराष्ट्रात राजकीय जागृती नानासाहेबांनी कायम ठेवली. त्यांचे दौरे, मठांना भेटी देणे, इतिहास संशोधनार्थ सफरी, यात्रा, राष्ट्र धर्मेतिहासार्थ ग्रंथमाला व मासिके यांचे प्रारंभ हे सारे याच काळात सुरू झाले, याच काळात इतिहासाचार्य राजवाडे व नानासाहेबांचे संबंध प्रस्थापित झाले, त्यामुळे राजवाड्यांचे धुळ्यास येणे जाणे वाढले. स. १९०५ ला राजवाडे व नानासाहेब प्राचीन भारतीय गणिती भास्कराचार्य ह्यांच्या पाटण नगरातील शिलालेख पाहाण्यास गेले. स. १९०६ साली त्यांनी सभेद्वारा 'प्रभात' नावाचे मासिक सुरू केले. राजवाड्यांच्या संगतीमुळे तर नानासाहेबांच्या संशोधन-व्यासंगाला चालना मिळाली.[१३]

संशोधनाचा व ग्रंथ प्रकाशनाचा व्याप वाढू लागल्यामुळे नानासाहेबांनी स्वतःचा छापखाना 'आत्माराम प्रेस' टाकला. यात सभेची सर्व मासिके, ग्रंथ छापले जाऊ लागले. धुळे नगरपालिकेचे स. १९१८ मध्ये सदस्य म्हणून नानासाहेब निवडून आले. स. १९२० ते १९३१ या काळात महाराष्ट्रात ते राष्ट्रीय सभेचे एक मान्यवर नेते होते. स. १९२३ च्या कौन्सीलच्या निवडणुकीत ते स्वराज्य पक्षातर्फे निवडूनही गेले. ते तेथे फॉरेस्ट कमिटीचे चेअरमन होते.[१५] तसेच जिल्हा खादी मंडळाचे अध्यक्षही होते. कौन्सीलमध्ये

त्यांनी आपल्या कार्याचा ठसा उमटविला, मिळणाऱ्या भत्त्याचा हिशोब ते जनतेपुढे सादर करीत. वरील सर्व व्याप सांभाळून नानासाहेबांनी श्री समर्थ वाङ्मय व इतिहास संशोधनाचे कार्य जीवनभर केले, हे विशेष होय.

संशोधन कार्यात काय काय विपत्ती येतात व माणसाला किती अवधाने पाळावी लागतात, याविषयी नानासाहेबांनी पुढील अवधाने नमूद केली आहेत -
१) वृद्ध माणसाच्या शब्दांवर केव्हाही विश्वास ठेवू नये, २) संशोधन-कार्यात कोणावरही जेवण्याचा भार सहसा घालू नये, ३) संशोधन-कार्यात केव्हाच निराश होऊ नये, ४) गावाबाहेर आधीच फराळ करावा, मग ग्रामी खुशाल प्रवेश करावा, ५) स्वतःची कितीही गैरसोय झाली किंवा स्वतःस कितीही त्रास पडला तरी संशोधकाने सर्व काही सोसावे, पण शक्यतोवर आपल्यासाठी दुसऱ्याची गैरसोय करू नये, ६) क्वचित द्रव्यही खर्च करण्याची संशोधकाची तयारी असावी, ७) संशोधकाने मिळेल ते घ्यावे व नंतर निवडून घ्यावे, ८) मिळालेली कागदपत्रे वगैरे कबूल केल्याप्रमाणे परत करण्याची वेळ सहसा टाळू देऊ नये, ९) संशोधकाने फार अधाश्यासारखेही करू नये, पण मिळण्याचा संभव असता काही टाकूही नये, तर प्रसंग पाहून वागावे, १०) संशोधकाने लोभमूलक पापापासून दूर सरावे, अत्यंत प्रामाणिकपणाने वागावे. काय वाटेल ते होवो, संग्रह मिळो वा न मिळो त्याने प्राणांतीही अपहारबुद्धीला मनात थारा देऊ नये, ११) संशोधकाला नुसते शिवकालीन मोडी लिपीचे ज्ञान असून भागत नाही तर त्यास फारशी व संस्कृत या भाषांचे ज्ञान असणे अगत्याचे आहे, १२) संशोधकास निरनिराळ्या काळातील प्राचीन लिपींचा परिचय असावयास पाहिजे, १४) संशोधकाबरोबर फोटो घेण्याचे सामान असल्यास उत्तम, १५) संशोधकाने आपल्या तरूण वयात होईल तेवढे संशोधन उरकून घ्यावे, १६) विद्यमान माणसांकडे न पहाता संशोधकाने मूळ पुरुषाकडे पाहावे. त्याच्या चरणावरून त्याने आपली दृष्टी ढळू देऊ नये.[१६] ही सर्व अवधाने पाळून नानासाहेबांनी आपले इतिहास-संशोधन केलेले दिसते.

शके १८१५ पासून शके १८५७ पावेतो ४३ वर्षे अव्याहतपणे 'सत्कार्योत्तेजक, सभेच्या द्वारे नानासाहेबांनी महाराष्ट्राची सेवा केली. अखंड जागृतीचा वन्ही चेतवून आणि सदाचार-स्फूर्तीचे कल्लोळ निर्माण करून ज्या श्री समर्थांनी महाराष्ट्राचे आनंदवन भुवन केले त्यांचे बसणे, बोलणे, उठणे, चालणे लिहिणे आणि गाणे कसे आणि कोठे होते ते शोधून काढून त्यांच्या कार्याचा पसारा आदीपासून अंतापर्यंत सखोल दृष्टीने पाहाण्यासाठी समर्थांचे सर्व मठ आणि घळ्या नानासाहेबांनी धुंडाळल्या. हाती लागेल ते कागद, पोथ्या, पत्रे इत्यादी साहित्य गोळा केले आणि हा बहुमोल ठेवा जतन करून ठेवला.[१७]

नानासाहेबांनी 'भारत इतिहास संशोधन मंडळा' च्या स्थापनेसही हातभार लावला. ते या मंडळाचे सदस्य होते. अनेक पाक्षिक सभांतून त्यांनी अभ्यासपूर्ण निबंध वाचलेत. तसेच मंडळाच्या त्रैमासिकांत त्यांचे ७० हून अधिक लेख प्रकाशित झाले आहेत.[१८]

भारत इतिहास मंडळ १९१० साली स्थापन झाल्यानंतर नानासाहेबांनी मंडळास पत्र लिहून सूचना केली की मंडळाची सभा भरवून त्यात निबंध वाचण्यात यावे व पुढील कामाचे स्वरूप ठरविण्यात यावे. [१९] त्यानुसार मंडळाचे शके १८३५ ला (३० एप्रिल-१/२ मेला) वार्षिक संमेलन भरले. या वार्षिक सभेत राजवाडे, नानासाहेब चांदोरकर यांनी लेखवाचन केले. "येक्केहाळी येथील श्री रामदासी विद्यापीठ" यावर नानासाहेबांनी निबंध वाचला. [२०] या अधिवेशनात नानासाहेबांनी संशोधनाचा ठराव मांडला - "ऐतिहासिक कागदपत्रे जमा करून त्यांचा संग्रह करावा, त्यामुळे संशोधनाची विविध दालने खुली होतील; तसेच त्या कामासाठी जो संशोधनाचे काम करील त्यास योग्य मानधन द्यावे." असा ठराव त्यांनी मांडून या कार्यासाठी स्वत:चे ५० रुपये दिले. [२१]

नानासाहेबांनी छत्रपती शिवाजी महाराजांची १० पत्रे संपादित केली आहेत. [२२] तसेच आपले सारे आयुष्य त्यांनी रामदासी वाङमय गोळा करून त्याच्या अध्ययनात घालविले. संपूर्ण भारतभर प्रवास करून ज्या ज्या ठिकाणी समर्थ वाङमय मिळेल ते ते गोळा करून संग्रहित केले. ते वाङमय व रामदास स्वामींची शिकवण सामान्य माणसांपर्यंत पोह्चविण्यासाठी त्यांनी 'रामदास आणि रामदासी' हे मासिक ज्येष्ठ शु. १३, शके १८३७ ला सुरू केले. या मासिकात त्यांनी अनेक अप्रकाशित ऐतिहासिक कागदपत्रांचा उलगडा करून शिवकालातील सामाजिक, धार्मिक, आर्थिक, राजकीय घटनांवर प्रकाश टाकला. रामदास स्वामींच्या व त्यांच्या संप्रदायाच्या अनेक पोथ्या, बाढे, ओव्या, अभंग व इतर धार्मिक ग्रंथ संपूर्ण भारत-भ्रमण करून त्यांनी गोळा केले. अर्वाचीन काळात त्यांनी ठिकठिकाणचे शिलालेख, ताम्रपट, जुनी कागदपत्रे व इतर ऐतिहासिक साहित्य यांचे प्रकाशन रामदास आणि रामदासी, इतिहास आणि ऐतिहासिक, भा. इ. सं. मंडळाचे त्रैमासिक, सत्कार्योत्तेजक सभेने प्रकाशित केलेले ग्रंथ, महाराष्ट्र साहित्य पत्रिका या विविध मासिकांतून व पुस्तकांतून केलेले दिसून येते. [२३] रामदासी मठ ही एकेकाळी प्रचंड ग्रंथसंग्रहालये होती. ती विश्वविद्यालयेच होती, असे नानासाहेब नेहमीच लिहीत व सांगत. त्यांचे हे उद्‌गार यथार्थ असल्याबद्दल त्यांनी प्रसिद्ध केलेल्या संशोधन-वृत्तांताचे परिशीलन केल्यास शंका राहात नाही. [२४] त्यांच्या रामदासी मासिकाने महाराष्ट्राच्या वाङमयात नवीन भर घातली. या मासिकामुळे आपल्या पूर्वजांच्या उज्ज्वल इतिहासावर नवीन प्रकाश टाकला गेला. या रामदासी मासिकांतून १८ वर्षात ९१९७ पृष्ठांचे लहान मोठे ३४ ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. नानासाहेबांनी जमविलेली वाङमयीन सामग्री म्हणजे त्यांनी मुंगीच्या श्रमाने, खटपटून व जपून ठेविलेले अमोल मौक्तीक भांडार आहे व रामदास आणि रामदासी मासिक हे त्याचे माहितीपत्रक आहे. आपल्या भांडारातील प्रत्येक मोत्याबद्दल जे जे म्हणून वक्तव्य करावयाचे होते ते ते नानासाहेबांनी केले आहे. [२५] धुळ्यातील श्रीसमर्थ वाग्देवता मंदिर व राजवाडे संशोधन मंदिर ह्या ऐतिहासिक संस्थांतील कागदपत्रांचा अभ्यास केल्याशिवाय महाराष्ट्रातील इतिहास व वाङमय संशोधकांचे संशोधन पूर्ण होणार नाही, या संस्थांची संशोधकांना दखल घ्यावी लागते.

आणखी ३९० ग्रंथ प्रसिद्ध होतील, इतकी साधन-सामग्री आज समर्थ वाग्देवता मंदिरात गोळा झालेली आहे.

नानासाहेबांनी १९१६ साली 'इतिहास आणि ऐतिहासिक' हे मासिक सुरू केले. त्याचे ३७ अंक निघाल्यावर ते बंद पडले. त्यातून इतिहास आणि ऐतिहासिक ग्रंथमालेचे ७ भाग प्रसिद्ध झाले. शिवकालीन घराणी, पेशवाईची अखेर, ऐतिहासिक विविध विषयाचे तीन खंड असे साहित्य प्रकाशित केले गेले. इतिहासाचार्य राजवाड्यांनीही या मासिकात बरेच लेखन केले आहे.

नानासाहेबांनी आपल्या प्रदीर्घ संशोधन कारकिर्दीत ३ हजार हस्तलिखितांची बाडे व ३ हजार ऐतिहासिक कागदपत्रे निष्ठेने जमविली व कष्टाने जपली. [२६]त्यांचे 'श्री रामदास आणि रामदासी' मासिक म्हणजे मूर्तीमंत तपश्चर्या आहे. समर्थ वाङमयाविषयीचे त्यांचे कार्य इतके प्रचंड आहे की, त्याला अलीकडील इतिहासात तोड नाही. स्वीकृतकार्याविषयी अखंड तळमळ, अढळ श्रद्धा, विलक्षण चिकाटी आणि निरलस उद्योगशीलता या गोष्टीत नानासाहेबांचा हात धरणारे महाराष्ट्रात फारच थोडे असतील. [२७]

## संदर्भ


१. श्री देव स्मृति ग्रंथ, श्री देव जन्मशताब्दी समिती, पुणे, १९७१, पृ. ३-१७
२. तत्रैव, पृ. ३-१८, १९
३. तत्रैव, पृ. ३-१७
४. तत्रैव, पृ. १९
५. तत्रैव, पृ. २०
६. तत्रैव, पृ. २१
७. तत्रैव, पृ. २०
८. तत्रैव, पृ. २६
९. तत्रैव, पृ. ३०
१०. सत्कार्योत्तेजक सभा सुवर्ण महोत्सव ग्रंथ
११. श्रीदेव स्मृतिग्रंथ, पृ. ३०
१२. तत्रैव, पृ. ३२
१३. तत्रैव, पृ. ३८
१४. तत्रैव, पृ. ४०
१५. तत्रैव, पृ. ५७
१६. रामदास आणि रामदासी मासिक, वर्ष १२ वे, अंक १३८, शके १८५३, पृ. ७०-७१

१७. महाराष्ट्र साहित्य पत्रिका, वर्ष ८ वे, जुलै १९३५, अंक दुसरा, संपादक-द. वा. पोतदार, पृ. ६०

१८. डॉ. परचुरे, त्रि. ना., भा. इ. सं. मंडळ पुणे, प्रकाशित लेख साधने इ. सूची, १९८१

१९. भा. इ. सं. मंडळ, प्रथम संमेलन वृत्त, कार्तिक व ११/१(३५), पृ. ६३

२०. तत्रैव, पृ. ७७

२१. तत्रैव, पृ. ६९

२२. देशपांडे, प्र. न., छत्रपती शिवाजी महाराजांची पत्रे, पृ. २७६

२३. रामदास आणि रामदासी, वर्ष १२ वे, अंक १३८

२४. रामदास आणि रामदासी, वर्ष १२ वे, अंक १४१

२५. रामदास आणि रामदासी, भाग ३९, चौथा सुमनहार, पृ. ९-१०

२६. श्री देव स्मृति ग्रंथ, पृ. ३५

२७. रामदास आणि रामदासी, चौथा सुमनहार, अंक २१७, पृ. १


□□□



अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेस
आमच्या हार्दिक शुभेच्छा!

## डॉ. जयसिंगराव पवार यांची ग्रंथ – संपदा

१. मराठी साम्राज्याचा उदय आणि अस्त
२. छत्रपती शिवाजी महाराज
३. महाराणी ताराबाई
४. मराठी सत्तेचा उदय
५. क्रांतिसिंह नाना पाटील
६. सेनापती संताजी घोरपडे
७. राजर्षी शाहू - एक दृष्टिक्षेप
८. छ. संभाजी स्मारक ग्रंथ

### आगामी

१. मराठेशाहीचा मागोवा
२. मराठेशाहीचे अंतरंग
३. छत्रपती राजाराम महाराज

---

**मंजुश्री प्रकाशन**
१०८, शिवतेज, साने गुरुजी वसाहत,
राधानगरी रोड, कोल्हापूर ४१६ ०१२.



# महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी, कोल्हापूर.

## एक आवाहन

महाराष्ट्राला मोठा वैभवशाली इतिहास आहे. गौरवशाली सांस्कृतिक परंपरा आहे. प्राचीन काळापासून महाराष्ट्राने हिंदुस्थानच्या इतिहासात अनमोल कामगिरी बजावलेली आहे. विशेषत: शिवछत्रपतींनी केलेले कार्य महाराष्ट्रात नव्हे तर सर्व देशात अभूतपूर्व मानले जाते. तसे पाहिले तर महाराष्ट्राचे 'मऱ्हाटीपण' शिवछत्रपतींच्या कालापासून साकारू लागले. हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेने त्यांनी मराठ्यांना राज्यकर्ते बनविले. त्यांच्या वारसदारांनी मराठ्यांचा जरी-पटका लाहोर-मुल्तानपर्यंत जाऊन पोचविला!

असे असले तरी आम्ही आमच्या या वैभवशाली इतिहासाविषयी अक्षम्य अनास्था दाखविली आहे. आम्ही इतिहास निर्माण केला खरा, पण तो भावी पिढ्यांसाठी जतन करून ठेवला नाही. आमच्या ऐतिहासिक वास्तू, गडकोट, कागदपत्रे इत्यादींची अपार हेळसांड होऊन आमच्या पराक्रमी इतिहासाची मोठी हानी झाली आहे. कालपुरुषाच्या तडाख्यातून अद्यापही काही ऐतिहासिक वास्तू / कागदपत्रे तग धरून आहेत. त्यांचे जतन / संशोधन करणे हे आमचे राष्ट्रीय महत्त्वाचे कर्तव्य आहे.

तेव्हा अशा प्रकारे आमच्या इतिहासाचे जतन / संशोधन भावी पिढ्यांसाठी केले जावे, या हेतूने आम्ही 'महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी' ही संस्था स्थापना केली आहे. पण इतिहास-संशोधन हाच केवळ एक हेतू या संस्थेचा नाही. इतिहास-संशोधनातून समाज-प्रबोधन व्हावे, हा दुसरा प्रधान हेतू संस्थापकांच्या मनात आहे. ज्यांनी आधुनिक महाराष्ट्राच्या समाजाची बांधणी केली त्या म. जोतीराव फुले, राजर्षी शाहू छत्रपती, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, कर्मवीर भाऊराव पाटील इत्यादी समाजसुधारकांचे आम्हा सर्वांवर मोठे ऋण आहे, अशी आमची धारणा आहे. या सुधारकांच्या चरित्रांचे संशोधन ही संस्था हाती घेईल. त्यांच्या चरित्रांची सामग्री प्रकाशित करणे, त्यांचे विचारधन महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यापर्यंत पोहचविणे हे संस्थेचे प्रमुख उद्दिष्ट्य असेल.

तसेच आज अनेक तरूण संशोधक आपापल्या क्षेत्रात नवनवे संशोधन करीत आहेत. काही जण आयुष्यभर एकाच विषयाचा ध्यास घेऊन कार्य करीत असतात. तथापि त्यांचे संशोधन पुरेशा आर्थिक पाठबळाभावी बासनात गुंडाळून ठेवावे लागते. असे मौलिक संशोधन समाजाच्या प्रगतीसाठी प्रकाशित होणे गरजेचे असते. तसे ते आमच्या संस्थेच्या व्यासपीठावरून सातत्याने प्रकाशित होईल. विशेषत: महाराष्ट्रातील तरूण संशोधक / लेखक यांचे एक बौद्धिक व्यासपीठ म्हणून ही संस्था कार्य करेल.

अर्थात संस्थेला हे कार्य करण्यासाठी पुरेशा निधीची आवश्यकता आहे. त्यासाठी येत्या दोन वर्षात संस्थेच्या कार्यासाठी ५ लाखाचा कायमचा निधी उभा करण्याचा संकल्प आम्ही सोडला आहे. सुदैवाने समाजाच्या सर्व स्तरांतून संस्थेस भरघोस पाठिंबा व अर्थसाहाय्य मिळत आहे. सन्माननीय देणगीदार म्हणून आपण संस्थेच्या समाज - प्रबोधनाच्या कार्यात सहभागी होऊ शकता. आपल्या सदिच्छा व अर्थपूर्ण पाठबळ हीच आमच्या कार्याची प्रेरकशक्ती असेल.

आपले

| | | |
|---|---|---|
| **शाहू छत्रपती महाराज** | **आम. श्रीपतराव शिंदे** | **डॉ. जयसिंगराव पवार** |
| चीफ पेट्रन | अध्यक्ष | संचालक |

संपर्क : **डॉ. जयसिंगराव पवार** एम. ए., पीएच. डी. (संचालक)

महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी, 'शिवतेज', १०८, साने गुरुजी वसाहत,

राधानगरी रोड, कोल्हापूर - ४१६ ०१२. दूरध्वनी - २७६४२

स्थापना - ९ जून, १९९२ रजि. क्र. ई. १२०८

# महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी

☐ चीफ पेट्रन

**श्री शाहू छत्रपती महाराज, कोल्हापूर**

☐ अध्यक्ष

**ॲड. श्रीपतराव शिंदे** M. L. A.

☐ संस्थापक - संचालक

**डॉ. जयसिंगराव पवार** M. A. Ph. D.

## महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनी, कोल्हापूर.

**सल्लागार मंडळ**

१. पं. सेतुमाधवराव पगडी, मुंबई.
२. डॉ. वि. भि. कोलते, नागपूर.
३. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, वाई.
४. श्री. स. मा. गर्गे, पुणे.
५. प्राचार्य एम्. आर्. देसाई, कोल्हापूर.
६. डॉ. सरोजिनी बाबर, पुणे.
७. डॉ. य. दि. फडके, मुंबई.
८. डॉ. रा. चिं. ढेरे, पुणे.
९. श्री. स. शं. देसाई, गोवा.
१०. डॉ. आबासाहेब शिंदे, कोल्हापूर.
११. प्राचार्य शिवाजीराव भोसले, फलटण.